प्रि. भाटे यांची प्रवासवृत्त–माला

पुष्प तिसरें

# हिंदुस्थानचें नंदनवन

अर्थात्

# काश्मीरचें वर्णन व वृत्तांत




लेखक व प्रकाशक :

**गोविंद चिमणाजी भाटे**

डे. ए. सोसायटी पुणें हिंचे सेवानिवृत्त तहाहयात सभासद्

---

आवृत्ति २ री




---



---

किंमत १ रुपाया



श्रीमंत गणपतराव माधवराव ऊर्फ बापूसाहेब पटवर्धन,
कुरुंदवाड ( ज्यूनियर ) संस्थानचे अधिपति

श्री.

श्रीमंत गणपतराव माधवराव ऊर्फ
बापूसाहेब पटवर्धन, कुरुंदवाड
( ज्यूनियर ) संस्थानचे
अधिपति

यांस

# हिंदुस्थानचें नंदनवन

हें प्रवासवर्णनपर पुस्तक विलिंग्डन कॉलेजचे
राजघराण्यांतील माझे पहिले विद्यार्थी
या त्यांच्या नात्याच्या स्मरणार्थ
ग्रंथकर्त्यानें सप्रेम व साशीर्वाद
अर्पण केलें आहे.

गो. चि. भाटे.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

माझ्या प्रवासवृत्तपर लेखाचा हा तिसरा भाग आहे. यांत हिंदुस्थानच्या वायव्य दिशेस असलेल्या काश्मीर प्रांतांतील माझ्या प्रवासाचें वर्णन आलेलें आहे. या विषयावर इंग्रज प्रवाशांनीं मोठमोठे ग्रंथ लिहिलेले आहेत. पण हे ग्रंथ काश्मीरांत वर्षोनुवर्षं राहिल्यानंतर बहुधा लिहिलेले आहेत. माझा काश्मीरांत थोडा वास झाला व त्यामुळें या निसर्गरमणीय प्रांताचा एक कोपराही माझ्या पूर्णपणें अवलोकनांत आला नाहीं. तरी पण काश्मीरचा जेवढा भाग अल्पावकाशांत मला पहावयास सांपडला त्याचें मीं वर्णन देण्याचा प्रयत्न केला. अर्थात् हें लहानसें पुस्तक काश्मीरचें साग्र वर्णन नव्हे हें उघड आहे, तर तें मार्गदर्शक हातखांबा (sign post) सारखें आहे. या खांबाकडे पाहून काश्मीर पाहण्याची वाचकांस जर उत्कट इच्छा उत्पन्न झाली तर हें पुस्तक लिहिण्याचें सार्थक झालें असें मी समजेन.

२७७ नारायण पेठ, पुणें शहर.<br>
ता. १४ जानेवारी सन १९११ } गोविंद चिमणाजी भावे.

---

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

या माझ्या प्रवासवृत्तपर पुस्तकाची पहिली आवृत्ति संपल्यास पुष्कळ काळ होऊन गेला. पण पुरेशा पैशाच्या व फुरसतीच्या अभावीं आजपर्यंत नवी व सुधारलेली आवृत्ति काढण्याचा योग आला नाहीं. डे. ए. सोसायटीच्या कामांतून मी कायमचा सेवानिवृत्त झाल्यानंतर लंकाबेट व केरल प्रांत हे प्रदेश पाहून आल्यावर त्या प्रवासवर्णनपर पुस्तकप्रकाशनाचे प्रसंगीं पूर्वीच्या सर्वच प्रवासवृत्तांची सचित्र एकसाची सुधारून वाढविलेली आवृत्ति काढण्याची मीं

योजना केली व तदनुरूप मालेंतील हें पुष्प मी प्रसिद्ध करीत आहें. एकंदर प्रवासवृत्तमालेपासून मनोरंजक माहिती मिळून वाचकांमध्यें बहुश्रुतपणा यावा म्हणून प्रत्येक पुष्पामध्यें प्रेक्षणीय वर्णनाच्या बरोबरीनें प्रांतांचा पुरातन व अर्वाचीन इतिहास यांची संक्षिप्त पण संगतवार माहिती दिली आहे. यायोगें हीं पुस्तकें मराठी व इंग्रजी शाळेंतील विद्यार्थ्यांकरितां **बक्षीस पुस्तकें व जलद वाचावयाचीं क्रमिक पुस्तकें** म्हणून फार उपयुक्त होतील अशी आशा आहे.

मी व माझे बंधु चि. गोपाळराव भाटे, वकील रोहें, असे आम्हीं दोघे मिळून सन १९१५ च्या मे महिन्यांत काश्मीरचा प्रवास केला. त्याला आतां जवळ जवळ वीस वर्षें होऊन गेलीं. त्या काळीं मोटारीच्या वहातुकीचा प्रसार झालेला नव्हता. तेव्हां जलद प्रवासाचें साधन म्हणजे घोड्याचे खासगी टांगे व टपालाचे टांगे हे होते. यामुळें तेव्हां प्रवासास जास्त वेळ व जास्त खर्चही लागे; यामुळें आतांप्रमाणें थोड्या वेळांत व खर्चांत पुष्कळ प्रांत पाहण्यास सांपडत नसे. म्हणून हिंदुस्थानच्या नंदनवनाचा फार थोडा भागच आम्हांला तेव्हां पाहतां आला. पण प्रत्यक्ष पाहिलेल्या प्रेक्षणीय स्थळवर्णनांबरोबर काश्मीरचा जुना नवा इतिहास यांची संक्षिप्त माहिती या आवृत्तीमध्यें घातली आहे. **पुन्हा एकदां नंदनवनांत** जाण्याची संधि साधल्यास या माझ्या वाङ्मय अपत्याचें धाकटें भावंड वाचकांस पाहण्यास सांपडेल.

या पुस्तकाचीं प्रुफें तपासण्याचें व सूची तयार करण्याचें सर्व काम चि. प्रो. मनोहर गोविंद भाटे यांनीं केलें. जुन्या रीतीप्रमाणें त्यांचे आभार मानण्याचें कारण नाहीं असें कोणास कदाचित् वाटेल. पण प्रुफें तपासणें व सूची तयार करणें हें मोठें किचकट काम आहे. तेव्हां त्याबद्दल मुलाचे आभार मानल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं.

पूर्वींच्या पुष्पाप्रमाणें हें पुष्प ठरल्यावेळीं प्रसिद्ध करतां आलें तें छापखान्यांतील लहानथोर कामगारांच्या मदतीनें करतां आलें म्हणून त्यांचाही मी आभारी आहें.

चंपाषष्ठी, १२ डिसेंबर सन १९३४
महाड, जिल्हा कुलाबा.

**गो. चि. भाटे.**

# अनुक्रमणिका.







# चित्रांची अनुक्रमणिका






Balodyan Press, Poona.

# हिंदुस्थानचें नंदनवन

अर्थात्

# काश्मीरचें वर्णन व वृत्तांत.

## प्रकरण १ लें.

### नंदनवनाकडे.

काश्मीरच्या अपूर्व सृष्टिसौंदर्यावरून इंग्रज प्रवासी त्या प्रांताला 'हिंदुस्थानचें नंदनवन' म्हणतात. पण काश्मीरचा हा लौकिक नवा नसून फार पुरातन कालापासून चालत आलेला आहे. संस्कृतांतल्या प्रसिद्ध 'राजतरंगिणी' या ऐतिहासिक ग्रंथांत पहिल्याच सर्गांत या प्रांताची खालील श्लोकांत महती गाइलीं आहे, त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते.

पुरा सतीसरः कल्पारंभात्प्रभृति भूरभूत् ।
कुक्षौ हिमाद्रेरर्णोभिः पूर्णा मन्वंतराणि षट् ॥
अथ वैवस्वतीयेऽस्मिन् प्राप्ते मन्वंतरे सुरान् ।
द्रुहिणोपेन्द्ररुद्रादीनवतार्य प्रजासृजा ॥
कश्यपेन तदन्तःस्थं घातयित्वा जलोद्भवं ।
निर्ममे तत्सरोभूमौ कश्मीरा इति मण्डलम् ॥

*   *   *   *

चक्रभृद्विजयेशादिकेशवेशानभूषिते ।
तिलांशोपि न यत्रास्ति पृथ्व्यास्तीर्थैर्बहिष्कृतः ॥

विजीयते पुण्यबलैर्बलैर्यत्तु न शस्त्रिणाम् ।
परलोकात्ततो भीतिर्यस्मिन्निवसतां परम् ।
सोष्मस्नानगृहाः शीते स्वस्थतीरास्पदा रये ।
यादोविरहिता यत्र निम्नगा निरुपद्रवाः ॥
असन्तापार्हतां जानन्यत्र पित्रा विनिर्मिते ।
गौरवादिव तिग्मांशुर्धत्ते ग्रीष्मेप्यतीव्रताम् ॥
विद्या वेश्मानि तुङ्गानि कुंकुमं सहिमं पयः ।
द्राक्षेति यत्र सामान्यमस्ति त्रिदिवदुर्लभम् ।
त्रिलोक्यां रत्नसूःश्लाघ्या तस्यां धनपतेर्हरित् ।
तत्र गौरीगुरुः शैलः यत्तस्मिन्नपि मण्डलम् ॥

[ कल्पारंभापासून सहा मन्वंतरांच्या काळांत हिमालयाच्या पोटांतील भूमि पाण्यानें तुडुंब भरलेली असल्यामुळें तिला सतीचें सरोवर म्हणत. पुढें हल्लीं चालू असलेला वैवस्वत मनु सुरू झाल्यावर प्रजापति कश्यपानें द्रुहिण, उपेन्द्र व रुद्र इत्यादि देवांना खालीं आणवून त्यांचे हस्तें त्या सरोवरांत राहणाऱ्या जलोद्भव ( राक्षसाला ) मारविलें व त्या भूमीवर काश्मीर या नांवाचा देश निर्माण केला.

* * * *

चक्रभृत् व विजयेश या रूपानें विष्णु व शंकर या देवांनीं विभूषित अशा त्या देशांत तीर्थ नाहीं अशी तीळभरसुद्धां जमीन नाहीं. तो देश पुण्याच्या सामर्थ्यानें जिंकला जाईल; पण सैन्याच्या सामर्थ्यानें जिंकला जाणार नाहीं. म्हणून त्या देशांतले लोक फक्त परलोकाला भितात. त्या देशांतील नद्यांपासून धोका नाहीं; त्या देशांतील नद्यांमध्यें हिंस्र जलचरें नाहींत; त्या देशांतील नद्यांमध्यें हिंवाळ्याकरितां उष्ण स्नानगृहांची सोय आहे; व त्या देशांतील नद्यांना पाण्यापर्यंत जाण्यास सुलभ घाट आहेत. आपल्या बापानें निर्माण केल्यामुळें त्रास देण्यास योग्य नाहीं असें जाणून त्या देशाला आदरानें उन्हाळ्यांतसुद्धां सूर्य प्रखरता भासवीत नाहीं. ज्या वस्तू स्वर्गांत सुद्धां दुर्मिळ, अशा वस्तु म्हणजे विद्या, उंच घरें, केशर,

बर्फमय पाणी व द्राक्षें, त्या देशांत अगदीं सुलभ व विपुल आहेत. त्रैलोक्यामध्यें बहुरत्नावसुंधरा ही प्रशंसनीय आहे; त्या पृथ्वीवर कुबेराची उत्तर दिशा अधिक प्रशंसनीय आहे; त्या उत्तर दिशेकडील पार्वतीचा बाप हिमालय हा विशेषच प्रशंसनीय आहे व त्या हिमालयामधील काश्मीर देश तर सर्वांत प्रशंसनीय आहे. ]

मोंगल बादशहांच्या काळीं हा प्रांत त्यांच्या साम्राज्याचा एक भाग असे, आणि जहांगीर व शहाजहान हे दोन्ही बादशाह त्या प्रांतांत वारंवार जात. काश्मीर हें त्यांचें आरोग्यालयच होतें म्हटलें तरी चालेल. जहांगिराची मरणकाळची शेवटची इच्छा मला काश्मीर पाहिजे, दुसरें कांहींएक नको, अशी होती ! ललितकलापराङ्मुख औरंगजेब बादशाहसुद्धां काश्मीरांत गेला होता. व त्याच्याबरोबरच प्रसिद्ध फ्रेंच प्रवासी बर्निअर हा काश्मीरांत गेला व त्यानें काश्मीरचें वर्णन आपल्या प्रवासवृत्ताच्या पुरवणींत दिलें आहे.

अगदीं प्राचीन काळापासून सृष्टिसौंदर्य, हवापाणी, फुलझाडें व फळझाडें यांकरितां नाणावलेला प्रदेश पहाण्याचा सुयोग आम्हांला येणार, हें पाहून आमचीं मनें सुप्रसन्न झालीं होतीं, हें सांगण्याची जरूरी नाहीं. **माझा अटकेपार प्रवास** संपवून आम्ही परत रावळपिंडीला बाराच्या सुमाराला आलों. लाला दिवाणचंद म्हणून एक खानदानीचे वकील तेथें आहेत. त्यांच्या घरीं आम्ही उतरलों होतों.आधीं तार पाठविली असल्यामुळें आमची सर्व व्यवस्था नीट लागली.

चाराच्या सुमाराला लालाजी कोर्टांतून आले, व त्यांनीं आमची विचारपूस करून पुढें केव्हां जाणार, याबद्दल चौकशी केली. 'आतां आम्हांला होतां होईल तितकें लवकर रवाना करा,' असें आम्हीं त्यांना सांगितलें.

"**रावळपिंडीहून** काश्मीरची राजधानी **श्रीनगर** ही १९६ मैल आहे. हा सर्व प्रवास टांग्यानें करावा लागतो. टपालच्या टांग्यानें गेल्यास अडीच

दिवस लागतात, व माणशीं भाडें ३२ रुपये पडतें. खासगी टांगा केल्यास पंचेचाळीसपासून पन्नासपर्यंत रुपये सबंद टांग्याला पडतात, व पांच दिवस लागतात. पण काश्मीरांतील सृष्टिशोभा स्वस्थपणें पहावयाची असेल, तर खासगी टांगा करून जाणें इष्ट आहे " असें लाला दिवाणचंदांनीं आम्हांला सांगितलें,व आम्हीं खासगी टांग्यानेंच जाण्याचें ठरविलें. लागलींच लालाजींनीं आपला नोकर पाठवून एका टांगेवाल्याला बोलावून आणलें, आणि जकात व पट्टी वगैरे सर्व मिळून पन्नास रुपये त्याला देण्याचें ठरविलें. टांग्यांत तीन माणसें बसण्याची परवानगी असते; पण प्रवास थोडासा सुखाचा व्हावा म्हणून आम्ही दोघांनीं स्वतंत्रच टांगा केला, व रात्रीं नऊ वाजतां निघण्याचा बेत कायम ठरविला.

**रावळपिंडीं**त आतां आमचा चारपांच तासांचाच मुक्काम होता. त्यांपैकीं थोडा वेळ आम्हीं लालाजींशीं बोलण्यांतच घालविला. सायंकाळीं आम्ही एका टांग्यांत बसून **रावळपिंडीचें** कँटोन्मेंट पाहून आलों. पेशावरपेक्षांहि येथली छावणी मोठी आहे, व रस्ते वगैरे फार चांगल्या स्थितींत आहेत, असें आम्हांला दिसून आलें. दोनएक तास याप्रमाणें सहल करून आल्यावर आम्हीं बिऱ्हाडीं परत आलों, व पुढल्या प्रवासाकरितां सामानाची बांधाबांध केली, आणि जेवणहि लवकरच उरकून घेऊन टांग्याची वाट पहात लालाजींच्या बगीच्यांत बसलों.

आतांपर्यंत आमचा हजारों मैलांचा प्रवास झाला; पण तो सारा आगगाडीचा होता.आतां मात्र सर्व प्रवास टांग्यानें व्हावयाचा असल्यामुळें या प्रवासाचा बिकटपणा मनांत येऊन मला माझ्या लहानपणच्या प्रवासाची आठवण झाली. मी पुण्यास विद्याभ्यासाकरितां रहात असतांना कोंकणांतून घांटावर येण्यासाठीं बैलगाडीनें प्रवास करावा लागे, व कोंकणाच्या बाजूकडून येतांना मोठा थोरला सह्याद्रि पर्वत ओलांडून येणें भाग पडे. या प्रवासाला तीनचार दिवस लागत. आतांचाहि आमचा प्रवास या बैलगाडीच्याच प्रवासासारखा होता; पण टांग्याचा असल्यामुळें बैलगाडीपेक्षां थोडा जलद.इतकाच काय तो फरक. आम्हांलासुद्धां प्रवासाला चारपांच दिवस

लागणार होते. वळाच्या मानानें असले प्रवास त्रासदायक असले तरी सृष्टि-सौंदर्य पहाण्याच्या उद्देशानें निघालेल्या माणसाला हा सावकाश प्रवासच अधिक चांगला, यांत शंका नाहीं. अशा प्रकारचे विचार मनांत येत आहेत, तोंच आमचा टांगेवाला आला. आम्ही आपलें सर्व सामान टांग्यांत भरलें, व दिवाणचंद्साहेबांचा निरोप घेऊन नंदनवनाकडे जावयाला सिद्ध झालों.

आम्ही **रावळपिंडी**हून निघालों तो दिवस गुरुवार ता. २० मे १९१५ हा होता. रात्रीं नऊ वाजतां आम्ही मार्गस्थ झालों. त्या दिवशीं वैशाख शुद्ध षष्ठी ही तिथि असल्यामुळें आम्ही निघालों तेव्हां साधारण चांदणें होतें. यामुळें सभोंवार थोडेंफार दिसत होतें. इकडले टांगे चांगले चालणारे असतात, यामुळें ताशीं सहासात मैल सहज जाऊं शकतात. आम्ही या वेगानेंच चाललों होतों. **रावळपिंडी**पासून जवळ जवळ पंधरा मैल रस्ता साधारण सपाटीचा आहे. पुण्याहून पायवाटेनें तळेगांवाला जातांना जसे लहानलहान चढउतार आहेत तशा प्रकारचे चढउतार येथें आहेत. सोळा मैलांपासून थोडा चढाव लागूं लागतो; पण टेकड्या फार उंच दिसत नाहींत. या लहानलहान टेकड्यांचा वरवर जातांजातां प्रचंड हिमालय बनतो, आणि आतां जो आपण लहानसा चढाव व टेकड्या चढत आहों त्या चढतचढत आपणांला जगांतला एक मोठा पर्वत ओलांडून जावयाचें आहे, याची कल्पनाहि त्या वेळीं होत नाहीं.

दोनचार मैल चढून गेल्यावर आम्हांला **छत्तर** म्हणून लहानसें खेडें लागलें. रात्रीचा बाराचा सुमार झाला होता; म्हणून टांगेवाला विश्रांती-करितां येथें उतरला. आम्हांलाहि विश्रांतीची व झोंपेची जरूर होती. कारण, टांग्याच्या हादरण्यानें व टांग्यांत सारखें बसण्यानें पाठीला कड आले होते! इकडल्या प्रांतांत जमिनीवर निजणें हें अगदीं कमी दर्जाचें समजतात. टांगेवाले सुद्धां जमिनीवर निजावयाचे नाहींत! प्रत्येक माणसाला निदान ‘चौपाई’ (चार पायांची हलकी खाट) तरी पाहिजेच अशी इकडे रीत असल्यामुळें असल्या चौपाया वाटोवाट भाड्यानें

मिळतात. भाडेंहि फार नसतें. येथें आम्ही एकएक आण्याला दोन चौपाया भाड्यानें घेतल्या व त्यांवर आंथरुणें टाकून पडलों. टांगेवाल्यानें घोड्याला खाणें विकत घेऊन घातलें. इकडे आपल्याप्रमाणें हरभरा घालण्याची रीत दिसली नाहीं. मक्याचें पीठ व गूळ यांचें मिश्रण करून तें पाण्यांत कालवून त्याचे लहान लहान गोळे करतात, व ते घोड्यांना देतात. घोड्याचें हें खाणें वाटोवाट मिळतें. यामुळें टांगेवाले जेथल्या तेथें घोड्याचें खाणें विकत घेऊन घोड्याला देतात, असें आमच्या दृष्टोत्पत्तीला आलें.

या ठिकाणीं आम्ही पहांटेच्या पांच वाजेपर्यंत विश्रांति घेतली. इकडे बहुतेक पांच वाजल्यापासून चांगलें दिसूं लागतें. यामुळें यानंतरचें सर्व मार्गक्रमण उजेडांत झालें. **छत्तर** या गांवापासून सारखा चढाव लागतो, व तो बराच कठिण आहे. यामुळें घोड्यांना मध्येंमध्यें थोडासा विसावा द्यावा लागतो. **रावळपिंडी**च्या बाजूला प्रथम लागणाऱ्या टेकड्यांवर फारसें रान नाहीं; पण आमच्या सकाळच्या मार्गक्रमणांत जिकडेतिकडे दाट झाडी व रान दृग्गोचर होत होतें. जिकडे पहावें तिकडे हिरवेंहिरवें गार रान व उंचउंच पर्वतच्या पर्वत !

सकाळच्या सातसाडेसाताच्या सुमाराला आम्ही **ट्रेट** या ठिकाणीं आलों. येथें मेलटांगा बदलण्याचें मोठें ठिकाण आहे. येथें कांहीं बंगले-वजा घरें दिसलीं, व येथें लहानसा बाजारहि होता. येथें टांगेवाल्यानें घोड्यांची थोडी चाकरी करून त्यांना दाणा दिला. आम्ही येथें मुख-मार्जनादि विधि आटोपून गरमगरम दूध घेतलें. अर्ध्यापाऊण तासाच्या विश्रांतीनंतर आम्ही वाट चालूं लागलों.

**रावळपिंडी**पासून आतांपर्यंत आम्हीं पंचवीस मैलांचा प्रवास केला, त्यांपैकीं दहा मैल सारखे चढावयाचेच होते. हा भाग वर म्हटल्याप्रमाणें **सह्याद्री**च्या घांटासारखाच दिसतो, व झाडेंझुडपेंहि आपल्या इकडच्या-सारखीं दिसतात; पण **ट्रेट** सोडून वरवर जाऊं लागलें म्हणजे सृष्टिसौंदर्य

सर्व बदलतें. पूर्वीं कधींहि न पाहिलेल्या पाईन व देवदार या प्रचंड उंच झाडांचें रान लागतें. हीं झाडें सरळ सोटासारखीं वाढतात, व त्यांना बारीकबारीक पानें असतात. यामुळें कांहीं अंशीं हे वृक्ष सुरूच्या झाडा-सारखे दिसतात; पण सुरूच्या झाडापेक्षां पुष्कळ जाड, उंच व भव्य असतात. रस्ताहि आतां जास्त जास्त वांकणें घेऊन जात होता. यामुळें घोड्यांना भार कमी व्हावा म्हणून मधूनमधून आम्ही मधल्या पायवाटेनें चालत जात होतों. आतां दृष्टीला पडणारा सर्वच देखावा आपल्या इकडल्यापेक्षां निराळा. इकडे झाडें सर्वच निराळीं. त्यांची उंचीहि विल-क्षणच ! पानें व फुलें विशेष सतेज व रमणीय! इकडील डोंगराची जमीन, खडक व दगड यांचा रंग निराळा ! ज्याप्रमाणें नाटकांत एकदम एकादा देखावा बदलून अगदीं निराळा देखावा दृग्गोचर होतो, त्याप्रमाणें येथें मनुष्याला भास होतो. हिमालयाच्या दक्षिणेकडील खालचा भाग व वरचा भाग यांमध्यें असेंच एकदम विलक्षण स्थित्यंतर होतें. आतां जिकडे पहावें तिकडे प्रचंड वृक्ष व जागोजाग पाण्याचे झरे ! या झऱ्यांचें पाणीसुद्धां अगदीं स्फटिकवत् स्वच्छ व गार असावयाचें !

आम्ही आतां सारखे वरवर चढत होतों. आतां हा चढाव चढला म्हणजे आपण माथ्यावर येऊं असें वाटावें. आणि तो चढाव चढून वर यावें तों त्याच्यापुढें आणखीहि प्रचंड चढाव आहेच ! हा चढाव चढल्या-वर तरी माथा येईल अशी आशा करावी, तरी पुनः पूर्ववत् निराशाच ! मला सह्याद्रीचा पुष्कळ परिचय. माझ्या लहानपणापासून मी बैलगाडीचा पुष्कळ प्रवास केलेला, व डोंगरावर डोंगर कसे सारखे चढत जातात याची मला बरीच कल्पना; तरी पण माझीसुद्धां या चढावांनीं फसगत होई. मग ज्यांचें सर्व आयुष्य सपाट प्रदेशावर गेलें आहे, व ज्यांनीं कधीं बैल-गाडीनें घांट चढण्याचा अनुभव घेतला नाहीं, त्यांना या मार्गानें गेल्यास काय वाटेल याची मला कल्पनाहि होत नाहीं ! हा पर्वत अगदीं अनंत आहे, असेंच त्यांना वाटेल यांत शंका नाहीं.

असें सारखें चढतांचढतां व प्रत्येक वेळेला आतां चढाव संपेल अशी फसगत होतां होतां आम्ही अकरा वाजण्याच्या सुमाराला **कोडागली** म्हणून ट्रेटपासून दहा मैलांवर एक गांव आहे तेथें आलों. येथें टांगेवाला दोन अडीच तास विश्रांति घेणार होता. अर्थात् आम्हांलाहि विश्रांति व त्याहिपेक्षां अन्नशांति पाहिजेच होती, म्हणून आम्ही येथें उतरलों. हा गांव बराच मोठा आहे. येथेंहि उत्तम पाण्याचे झरे पुष्कळ आहेत. गांवांत विहिरीहि दिसल्या. आम्ही दोनतीन तासांकरितां एक खोली व दोन चौपाया घेतल्या, व त्याला एकंदर सहा आणे भाडें ठरविलें. नंतर पुरी, तर्कारी व आणखी थोडी मेवामिठाई विकत घेऊन हातपाय धुऊन यथेच्छ फराळ केला, व चौपायांवर पडून राहिलों.

दोन वाजण्याच्या सुमाराला आम्ही पुनः पुढें चालू झालों. अजून आम्ही वर चढतच होतों. आतां सर्व डोंगर हिरवेगार दिसत होते; पण कांहीं डोंगर मात्र बरेच उघडेबोडकेहि असल्याचें आढळून येई. सह्याद्रीच्या मुख्य डोंगरांत गेलें म्हणजे जसें निर्जन व भयाण वाटतें, तसें इकडे वाटत नाहीं. जागोजाग डोंगरांत वसती आहे, व डोंगरावर जिकडे तिकडे पाण्याचे पाटच्यापाट चालू असल्यामुळें इतक्या उंचउंच डोंगरांवरसुद्धां लहानलहान हिरवींगार शेतें दृष्टीला पडतात. येथला देखावा किंचित् रत्नागिरी-कोंकणांतल्या पाखाड्यांतल्यासारखा दिसतो. येथली मातीहि तांबडीच आहे, व डोंगराच्या उतारावर ताली घालून लहानलहान सपाट पट्टे तयार करून भातशेतें केलेलीं दृष्टीला पडतात.

अशा प्रकारची अपूर्व शोभा पहातपहात शेवटीं एकदां आम्ही **मरी** या ठिकाणाशीं आलों. पंजाबसरकारचें हेंच उन्हाळ्याचें शीतल वसतिस्थान आहे. हें **रावळपिंडी**पासून चाळीस मैल आहे. म्हणजे **वाठार**पासून **महाबळेश्वर** जितकें दूर आहे, तितकाच हा पल्ला आहे, मात्र **मरी** समुद्रसपाटीपासून साडेसात हजार फूट उंच आहे तर **महाबळेश्वर** साडेचार हजार फूट आहे. अर्थात् **महाबळेश्वरापेक्षां मरी** तीन हजार फूट अधिक उंच आहे, व म्हणूनच **मरी**ची चढण सरतां सरत नाहीं.

**मरी**पासून मात्र मनुष्य उतरण उतरूं लागतो, व हिमालयाचा दक्षिण-भाग ओलांडून उत्तरभागांत प्रवेश करतो. हिमालयांतील विलक्षण वनश्रीला येथूनच खरी सुरुवात होते. हा हिमालय किती रुंद रुंद पसरत गेलेला आहे याची कल्पना आमच्या मार्गक्रमणवर्णनावरून वाचकांना कळून येईल. पण आतां वनसौंदर्य खरोखरींच अपूर्व आहे, असा क्षणोक्षणीं प्रत्यय येतो. डोंगर केव्हांहि उघडेबोडके दिसत नाहींत. जिकडे तिकडे पावसाळ्या-सारखी वनशोभा भर उन्हाळ्यांत दिसते. कारण या प्रांतांत बहुतेक बाराहि महिने थोडाफार पाऊस पडतो, व उन्हाळ्यांत हिमालयांतील बर्फ वितळूं लागल्यामुळें भर मे महिन्यांत आपल्या इकडल्या पावसाळ्या-प्रमाणें जिकडे तिकडे नदीनाले पाण्यानें भरून जातात. रस्ते व जमीन अगदीं लख्ख कोरडी; हवा अगदीं कोरडी; सूर्यप्रकाश अगदीं उन्हाळ्या-सारखा; कोठेंहि चिखल अगर राड नाहीं;तरी पण जिकडे तिकडे हिरवी-गार जमीन व शेतें हा देखावा खरोखरींच प्रथमतः मनुष्याला आश्चर्य-चकित करून सोडतो. या वेळीं मला हरिद्वारची आठवण झाली. तेथेंहि भर उन्हाळ्यांतील तो प्रचंड पूर पाहून मनाला अत्यंत विस्मय वाटतो.

**मरी** सोडल्यापासून दोनएक तासांनीं आम्ही **फुगवाडी** म्हणून लहानसें गांव आहे तेथें आलों. हें **मरी**पासून बारा मैल आहे. **मरी**पासून सारखा उतार लागत रहातो, हें वर सांगितलें आहे. हें गांव सरासरी उत्तरेकडील उताराच्या अर्ध्यावर आहे. अर्थात् आम्हांला अजून अर्धा उतार उतरावयाचा होता. **फुगवाडी**ला टांगेवाल्याचा रात्रीची विश्रांति घेण्याचा विचार होता. इकडे रात्रीच्या प्रवासाची बंदी आहे. **रावळपिंडी**-पासून पंधरा मैल सपाटीचा रस्ता असल्यामुळें पाहिजे तर तेवढा रात्रीचा प्रवास केला तरी चालतो. तेव्हां **फुगवाडी**ला सर्व रात्र काढा-वयाची असल्यामुळें **छत्तर**प्रमाणें आम्ही येथें एक खोली व दोन चौपाया भाड्यानें घेतल्या, व सर्वांबद्दल भाडें आठ आणे ठरविलें.

आम्ही या प्रवासांत कुकररूपी आमची स्थाली बरोबर घेतली होती. घरापासून आजपर्यंतच्या तीन आठवड्यांच्या प्रवासांत या स्थालीचा

उपयोग करण्याचें कारण पडलें नाहीं, तेव्हां तिचा उपयोग करण्याचा विचार करून आम्हीं भात, भाजी व वरण इतके पदार्थ तयार केले, व सातसाडेसातांच्या सुमाराला जेवणखाण आटपून स्वस्थ पडलों. रावळ-पिंडीहून आम्ही गुरुवारीं रात्रीं निघालों, ते शुक्रवारीं सायंकाळीं ५२ मैलांचा मार्ग एकाच टांग्यानें आक्रमण केला, हें पाहून आम्हांला एक प्रकारचें समाधान झालें. पण या प्रवासांतला तिसरा हिस्साहि अजून पुरा झाला नाहीं, हें लक्ष्यांत येऊन आमच्या प्रवासाच्या लांबीची पूर्ण कल्पना आमच्या मनांत आली. इतक्या दीड दिवसाच्या प्रवासाच्या दगदगींमुळें आम्हांला विश्रांतीची फार जरूरी होती, तदनुरूप आंथरुणा-वर पडतांक्षणींच आम्ही निद्रावश झालों.

पहांटेला साडेचार वाजतां आम्ही उठलों, व पांच वाजतां वाट चालूं लागलों. आदल्या दिवशीं आम्ही वरवर चढत असतां स्वर्गापर्यंत चाललों कीं काय, असा भास होत होता, तर आतां त्याच्या अगदीं उलट म्हणजे खोलखोल पाताळापर्यंत उतरत जातों कीं काय, असा भास होत होता. कारण, आम्ही सारखे उतरत व म्हणूनच झपाट्यानें चाललों होतों. **फुगवाडी** टाकल्यापासून लवकरच प्रचंड खोल अशा दरींत अगदीं झऱ्यासारखी एक नदी दिसूं लागली. हीच नदी **झेलम** होय, व आतां हिच्याच कांठाकांठानें आपला पुढला सर्व रस्ता आहे, असें टांगेवाल्यानें आम्हांला सांगितलें. **झेलम** नदीचें प्रथम दर्शन आम्हांला **झेलम स्टेशनवर लाहोर**हून **कँबेलपुर**ला जातांना झालें होतें. त्या वेळीं ती नदी समुद्रासारखी दिसत होती. आतांचें हें तिचें द्वितीय दर्शन होय. या वेळीं ती कितीतरी सूक्ष्म दिसत होती. कारण, आम्ही तिच्या हजारों फूट उंच अशा पर्वतराजीवरून खालीं खालीं येत होतों. जसजसे आम्ही खालीं खालीं येऊं लागलों होतों, तसतशी **झेलम** नदी जास्त जास्त स्पष्ट दिसूं लागली, आणि तिचा तो प्रचंड वेग व खळखळ आवाज हीं दिसूं व ऐकूं येऊं लागलीं.



नं. १ झेलम नदीकांठचा रस्ता पान १०

या ठिकाणीं ही नदी आपल्या उजव्या हाताला असते. एकीकडे प्रचंड पर्वत तर एकीकडे खोल दरी व तिच्या तळाशीं प्रचंड वेगानें वहाणारी ती नदी ! हा देखावा विलक्षण वाटतो. खंडाळाघाटांतील **खंडाळें** स्टेशननंतरची दस्तुरी किंवा रिव्हर्सिंग स्टेशन टाकून जरा पुढें आल्यावर जसा देखावा दिसतो, तसाच येथेंहि देखावा दिसतो. पण त्या दरींतील नदी आपल्याच दिशेनें **कर्जत**कडे जातांना दिसते. येथें मात्र नदी उलट दिशेनें चालली आहे, असा भास होतो. आपण **मरी** येथील प्रचंड हिमालय ओलांडून उतरत असतों. अर्थात् या डोंगरांतून नदी निघून उत्तरेकडे जावी, असें आपणाला स्वाभाविकपणें वाटतें. पण ही नदी तर **मरी**च्या बाजूच्या डोंगराकडे जातांना दिसते ! ही नदी अशी विचित्रपणें प्रचंड डोंगराकडे कोठें चालली आहे, असें वाटून मन अगदीं गोंधळून जातें. टांगा तर भराभर डोंगर उतरून खालीं खालीं जातो, व नदीच्या अगदीं जवळ येतो. पण ती प्रचंड तटासारखी नदीची दुथड पाहून मनुष्याला भय वाटल्याखेरीज रहात नाहीं. जरा का गाडीचें चाक उजव्या हाताला घसरलें, कीं, बघावयालाच नको ! एकदम ‘ **नद्यस्तृप्यन्तु** ’ ची पाळी यावयाची, इतका डोंगर सुळक्याचा असतो, व वाट इतकी बिकट वाटते. हळूहळू आपण नदीच्या पातळीकडे येत आहों, असें दृष्टोत्पत्तीला येतें. शेवटीं अगदीं नदीकिनाऱ्याला खेटून सडक जाऊं लागते, व **झेलम** नदीचें तें अरुंद पात्र, तिचा तो वेग, व किंचित् धूसर पाणी पाहून मनाला एक प्रकारचा विलक्षण आनंद होतो, तोंच टांगा **कोहाला** गांवाला येऊन ठेपतो. **कोहाल्याला** आम्ही सात साडेसातांच्या सुमाराला आलों.

**झेलम** नदी हीच पंजाब व काश्मीर संस्थान यांमधील मर्यादा आहे, व **कोहाला** हा गांव नदीपलीकडे असून तो संस्थानच्या हद्दींत आहे. येथें झेलम नदीवरील पूल ओलांडून पलीकडे गेलें म्हणजे डॉक्टरी तपासणी होते. तसेंच येथें माणसावर, टांग्यावर व व्यापारी मालावर कर द्यावा लागतो. या सर्व विधीला अर्धापाऊण तास लागतो.

**कोहाला** हा गांव नदी व पर्वत यांच्या अगदीं चिळणींत आहे. कोठें कोठें इतर्का घरें आहेत, तर कांहीं ठिकाणीं खडक खोदूनच घरापुरती सपाट जागा केलेली आहे. येथें या प्रांतांतील देवदाराचा विपुलपणा एकदम दृग्गोचर होतो. कारण, घराचें सर्व लांकूडकाम देवदाराचेंच दिसतें. खांब, लगी, तुळया, कड्या, कडीपाट, खिडक्या, दरवाजे वगैरे घराला लागणारें सर्व सामान एकाच लांकडाचें केलेलें दृष्टोत्पत्तीला येतें. **ग्वाल्हेरीला** ज्याप्रमाणें तांबड्या दगडाचींच सर्व घरें, त्याप्रमाणें येथें सर्व देवदाराचींच घरें दृग्गोचर होतात, व देवदाराचा तो सतेज पिंपळ-सर रंग मोठा मोहक दिसतो. **कोहाला** हा गांव कांहीं फारसा मोठा नाहीं. पंजाबचें शीतलनिवासस्थान जें **मरी**, तें सोडलें म्हणजे सारखा उतरत उतरत मनुष्य **कोहाल्याला** येतो. तेथें सभोंवार जिकडे तिकडे प्रचंड पर्वत दिसतात, व आपण खोल भुयारांत येऊन, पडल्यासारखें वाटतें. तरी पण हें ठिकाण दोन हजार फूट उंच आहे. म्हणजे **मरी**पासून हें साडेपांच हजार फूट खोल आहे. येथून आतां **झेलम** नदी सारखी आपल्या डाव्या हाताला रहाते, आणि रस्ता व नदी यांची फारशी ताटातूट होत नाहीं. केव्हां केव्हां युरोपियन युवयुवतींप्रमाणें रस्ता व नदी जणूं कांहीं हातांत हात घालून चालल्यासारखीं भासतात, तर केव्हां नदी रुसून रस्त्यापासून दूर अगदीं कोंपऱ्यांत जाऊन बसते, व रस्त्याला अगदीं दिसेनाशी होते. मग रस्ता जणूं काय अस्वस्थ होऊन धडाधड उड्या मारीत व सांदीकोंदींतून झपाझप पावलें टाकीत नदी असेल त्या कोंपऱ्यांत येऊन पुनः तिला आलिंगन देतो कीं काय, असा भास होतो. असा हा नदीचा व रस्त्याचा संयोग विलक्षण आहे. केव्हांकेव्हां रस्त्याच्या समोर प्रचंड पर्वत असा खडा उभा येऊन रहातो, कीं, पुढें वाट असणें शक्य नाहीं, असें वाटतें; तोंच एक अगदीं अरुंद चीर दृष्टीला पडते, आणि त्या अरुंद चिळणींतून नदी व रस्ता अगदीं एकमेकांना खेंटून पुढें गेलेलीं दिसतात. असे विलक्षण चमत्कार या पुढल्या प्रवासांत वाटोवाट लागतात.

**कोहाल्या**पासून हळूहळू व नकळत आपण पुनः वरवर चढत जातों. **कोहाल्या**ला एक तासभर थांबल्यावर आम्ही पुढल्या मार्गक्रमणाला लागलों. तेथून संस्थानचे निराळे मैल सुरू होतात. **कोहाल्यापासून श्रीनगर** एकशेंबत्तीस मैल आहे. इतका मार्ग अजून आम्हांला आक्रमावयाचा होता. **कोहाल्याहून छत्तर** म्हणून एक लहानसें गांव सात मैलांवर आहे. तेथें आम्ही साडेदहांच्या सुमाराला आलों, व दोनप्रहरची विश्रांति येथें घेतली. या ठिकाणीं नदीच्या दोन्ही बाजूंचे डोंगर जरा दुरावले असल्या-मुळें येथें सपाट जमीन बरीच असून तीं सर्व शेतजमीन आहे, असें आम्हांला आढळून आलें. या सर्व प्रांतांत पाण्याची विपुलता विलक्षण आहे. एक फर्लांगहि सुंदर वाहत्या झऱ्याखेरीज मोकळा जात नाहीं. **छत्तर** गांवांत तर एक सुंदर पाण्याचा झरा एका छातीइतक्या उंच नळाच्या तोंडांतून सोडलेला आहे. या झऱ्याचें तें धोधो वाहणारें शुभ्र व गार पाणी पाहून **नैनिताल**च्या अशा एका ठिकाणाची आम्हांला आठ-वण झाली. **नैनिताल**ला असे तीनचार झरे सारखे पडत आहेत. येथें एकच आहे. पण बाकी बाबतींत दोन्ही ठिकाणांमध्यें अगदीं साम्य आहे. या झोताखालीं उभें राहून जेव्हां आम्हीं स्नान केलें, तेव्हां किती अनुकूल संवेदना उत्पन्न झाल्या, याचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे. स्नान झाल्यावर आम्ही तेथें चहा घेतला व फराळ केला, आणि एका झाडाखालीं विश्रांति घेत पडलों. सुमारें दोन अडीच वाजतां पुनः आम्ही आपल्या मार्गाला लागलों.

हा सर्व मार्ग भयंकर दऱ्याखोऱ्यांतून व प्रचंड पहाडांच्या चिळणींतून गला आहे, तरी तो निर्जन प्रदेशांतून गेला आहे असें मात्र नाहीं. वाटो-वाट खेडीं व वसती लागते; इतकेंच नाहीं, तर खोल नदीच्या तीरापासून तों थेट उंच पर्वताच्या शिखरापर्यंत जागोजाग घरें, झोंपड्या व शेत-वाड्या दृष्टीला पडतात. हीं घरें डोंगराच्या बाजूवरच असल्यामुळें व तीं सपाट धाब्याचीं असल्यामुळें दुरून आपल्याकडे असलेल्या डोंगरांतील लेण्याप्रमाणें भासतात. तसेंच सर्व डोंगरभर शेती केलेली दिसते. हीं शेतें

अगदीं अरुंद, लांब पट्ट्यांचीं व एकावर एक अशीं असल्यामुळें दुरून सोपानपरंपरेसारखीं दिसतात. आम्ही गेलों ते दिवस तिकडे भाताच्या लावणीचे होते. यामुळें कांहीं शेतें गालीच्यासारखीं हिरवींगार दिसत होतीं. यांत अर्थात्च भाताचीं रोपें तयार झालेलीं असत. कांहीं लावणी-करितां पाण्यानें तुडुंब भरलेलीं असत. कांहींमध्यें नुकतेंच भात लावलेलें दिसे. यामुळें हा सर्व देखावा मोठा मनोहर दिसून तेथल्या शेतकीचें कौतुक वाटे. येथें शेती फार काळजीपूर्वक होत असावी, असें दिसलें. याची एक साक्ष म्हणजे येथले शेताचे बांध अगदीं नीटनेटके असतात ही होय. यामुळें हीं शेतें ड्रॉइंगच्या निरनिराळ्या आकृतींप्रमाणें सुबक व रेखलेलीं दिसतात.

येथल्या वसतीची दुसरी खूण म्हणजे वाटोवाट जेथें जेथें पाण्याचे पाट वहातात, तेथें तेथें लहान दळणाच्या पाणचक्क्या असतात, ही होय. यांचें तर प्रथम जाणाराला फारच आश्चर्य वाटतें. एका लहानशा झोंपडीखालीं पाण्याचा पाट आणलेला असतो, व त्याच्या जोरावर एक चक्की सुरू राहून त्यांतील जात्यानें धान्याचें दळण होतें.

**छत्तर**हून आम्ही निघालों, ते तासासव्वातासानें **दुलाई** गांवीं आलों, व तेथून लगेच पुढें चालू होऊन सहांच्या सुमाराला **डुमेल** गांवीं आलों. **कोहाल्या**प्रमाणें हा गांवहि **झेलम**च्या अगदीं कांठीं आहे, व येथेंच **किशनगंगा** नदीचा **झेलम**शीं संगम झालेला आहे. **रावळपिंडी**च्या उत्तरेला **अपटाबाद** म्हणून एक ठिकाण आहे. तेथून काश्मीराकडे जाणारा एक रस्ता असून तो येथें **रावळपिंडी**कडील रस्त्याला येऊन मिळतो. यामुळें येथेंहि पुनः प्रवाशांची फेरतपासणी होते. येथें **कोहाल्या**प्रमाणें **झेलम**ला एक सुंदर पूल आहे; दोन नद्यांच्या संगमा-मुळें हें ठिकाण **कोहाल्या**पेक्षां अधिक रमणीय आहे. पुलाच्या दोन्ही बाजूंना नदीपर्यंत लहानसे घाट बांधलेले आहेत. त्या घाटावरून **किशनगंगा** व **झेलम** या दोन्ही नद्यांचीं तीं बिकट पहाडांतून येणारीं पात्रें आणि

दोन्ही नद्यांचा वेग पाहून मनाला फार आश्चर्य व कौतुक वाटतें व सृष्टीच्या विविध रूपांची प्रचीति येते.

**अपटाबाद**कडून येणारा मार्ग फारसा वाहता नाहीं, व तो **रावळपिंडी**च्या मार्गापेक्षां अधिकच भयंकर आहे, असें तेथें आम्हांला कळलें. **डुमेल** येथें तपासणी वगैरे आटोपेपर्यंत आम्हांला सहा वाजले.

**रावळपिंडी**पासून **मरी**पर्यंतचा देखावा एक प्रकारचा, तर तेथून **डुमेल**पर्यंत निराळ्या तऱ्हेचा; तसेंच **डुमेल**पासून पुढेंहि निराळाच देखावा दृष्टीला पडतो ! येथलें रान फार दाट असून सभोंवतालचे पहाड फारच प्रचंड आहेत. येथून मधूनमधून बर्फानें आच्छादलेल्या हिमालयाचीं शिखरें डोकावतात, व मनाला विलक्षण आनंद देतात. **झेलम** स्टेशनशीं **झेलम** नदी लागते, तेथपासून **डुमेल**पर्यंत ती थेट दक्षिणवाहिनी आहे. अर्थात् काश्मीरकडे जातांना रस्ता अगदीं उत्तरेकडे जातो पण **डुमेल** या ठिकाणीं ती नदी विलक्षण वळण घेऊन आग्नेय दिशेला वळते. **किशनगंगा** ही पुढें सारखी उत्तर दिशेकडे लागते. यामुळें **किशनगंगे**ला **झेलम** येऊन मिळते, असें म्हणणेंहि एका अर्थी वावगें होणार नाहीं.

**डुमेल**हून पुढला एक मुक्काम **गडी** येथें आम्ही आलों, तों रात्रीचे साडेआठ झाले. येथेंहि आम्ही एका व्यापाऱ्याच्या दुकानीं उतरलों, व आमच्या स्थालीच्या साहाय्यानें स्वयंपाक करून रात्रीची विश्रांति घेतली.

इकडील प्रवासाच्या रीतीला अनुसरून आम्ही सकाळीं सहाच्या सुमाराला निघालों. **झेलम** नदीचीं तीं विलक्षण वांकणें फार विस्मयजनक वाटतात. या सर्व मार्गांत नदींतील भोंवरे जागोजागीं दिसतात. कारण एकाद्या वांकणाच्या पुढेंच खडकाचा तट येतो; यामुळें पाणी आघातानें मागें हटून मग अर्थात् वर्तुळ करून पुनः जोरानें पुढें जातें. या नदींत मोठेमोठे लांकडाचे ओंडे वहातांना दिसतात. कारण नदीच्या प्रवाहाला कोठेंहि खंड नसल्यामुळें पंजाबांत या नदीच्या मार्गानें लांकडें रवाना

करणें बिनखर्चाचें असतें. अशीं लांकडें वहात जात असतांना वाटोवाट दिसतात, व भोंवऱ्याच्या ठिकाणीं तर या लांकडांची मोठी मौजच दिसते. हीं लांकडें भिंगऱ्यासारखीं फिरत रहातात. कमीअधिक पाण्याच्या जोरानें तीं जेव्हां एकदां या भोंवऱ्यांतून निसटतात तेव्हांच तीं पुढल्या प्रवाहांत जाऊन त्यांचा प्रवास चालू होतो. नाहींतर त्या भोंवऱ्यांत गटंगळ्या खात व गिरक्या मारितच तीं बसतात. मानवी जीवित व जीवात्मा असाच संसाररूपी भोंवऱ्यांत गटंगळ्या खात रहातो ही कल्पना या लांकडांच्या वर्तनावरून चांगली मनांत बिंबते.

नदीचा प्रवाह फार खोलांतून जातो, आणि यामुळें या नदीला मिळणारे ओढे व नालेहि भयंकर खोल असतात. असे नाले वाटोवाट लागतात, आणि नदीप्रमाणें तेहि निर्मल व स्वच्छ पाण्यानें धो धो वहात असतात. पण हे ओढे ओलांडण्याकरितां नदीजवळ पूल करणें अशक्य असल्यामुळें रस्ता पहाडांत खोलखोल जाऊन मग तेथें पूल ओलांडून ओढ्याच्या दुसऱ्या बाजूला जातो. यामुळें रस्त्याला विलक्षण वांकणें घ्यावीं लागतात. येथें एका ओढ्याच्या रस्त्याचें वर्णन दिलें, म्हणजे सर्वांची कल्पना येईल.

आम्ही एका ओढ्याच्या मुखाशीं आलों. येथें तो ओढा नदीला मिळाला होता. ओढा फार खोल, पण फार रुंद नव्हता. त्या ठिकाणीं त्यावर पूल केला असता, तर तो कांहीं एका फर्लांगापेक्षां जास्त झाला नसता. समोरचा रस्ता आम्हांला चांगला स्पष्ट दिसत होता; म्हणून आम्हीं तो सर्व रस्ता चालून जावयाचा बेत केला, व टांगेवाल्याला त्याप्रमाणें सांगून रस्त्यानें चालूं लागलों. आम्हीं सारखे खोलखोल दरींतच चाललों. एक मैल झाला तरी पूल येईना! दीड मैल झाला तरीहि तेंच! पुढें मात्र लवकरच पूल आला. तेथें ओढ्यांतून धो धो पाणी वहात होतें. पूल ओलांडल्यावर जेथून आम्ही निघालों त्या रस्त्याच्या समोर येतों, तों आम्ही साडेतीन मैल चालून आलों, असें आम्हांला दिसून आलें. अशीं विलक्षण वांकणें या रस्त्यांत शेंकडों आहेत! असो.

काश्मीरच्या महाराजांच्या हद्दींत डांकबंगले व हिंदीलोकांकरितां स्वस्त अशा उतरण्याच्या जागा रस्तोरस्तीं आहेत. मुख्य मुख्य गांवीं महाराजांकरितां बांधलेलीं विश्रांतिगृहेंहि आहेत. त्याठिकाणीं महाराजांच्या किंवा रेसिडेंटांच्या खास पाहुण्यांना उतरावयाला मिळतें. या सर्व सोयी कशा काय आहेत, त्या पहाण्याकरितां आम्हीं एकदां या ठिकाणीं उतरण्याचा निश्चय केला. डांकबंगल्याच्या खर्चिकपणाचा आम्हांला मागें एकदां अनुभव आला होता, म्हणून येथें जेवावयाला उतरावयाचें नाहीं, असें आम्हीं ठरविलें होतें. पण चहाची वगैरे सोय कशी आहे, हें पाहण्याकरितां जेव्हां साडेआठांच्या सुमाराला आम्ही हड्डी गांवीं आलों, तेव्हां डांकबंगल्यांत जाऊन चहा व पाव मागितला. डांकबंगला चांगला हवाशीर दिसला, व डांकबंगल्यांत असणाऱ्या सर्व सोयी तेथें होत्या. हातपाय धुतल्यावर आम्ही वाट पहात बसलों, तों चहा, लोणी व पाव हे जिन्नस आले. आपल्या इकडच्या रिफ्रेशमेंटरूमप्रमाणें येथें व्यवस्था असून किंमतीचा आकारहि त्या मानानेंच आहे. म्हणजे आम्हांला दोघांचा एक रुपया द्यावा लागला.

तेथें तासभर विसांवा घेऊन आम्ही पुनः मार्गस्थ झालों, तों बारा वाजतां चकोटी या गांवीं आलों. येथें आम्ही हिंदु लोकांकरितां बांधलेल्या 'हिंदु स्वयंपाकगृहांत' उतरलों. येथली व्यवस्था कमी खर्चाची असते; पण वाईट नसते. एक आचारी व एक नोकर तेथें असून आपल्याला पाहिजे त्या वस्तु आचारी करून घालतो. आम्ही तेथें उतरल्यावर ब्राह्मणाला डाळ व भात करावयाला सांगितलें. त्यानें विचारलें "मच्छीभात पकाऊं क्या ?"

हें वाक्य ऐकून आम्ही आश्चर्यचकित झालों, व त्याला म्हटलें "आम्ही ब्राह्मण आहों."

तेव्हां तो म्हणाला "हम्‌भी बम्मन है; मच्छीभातको क्या हरज है ?"

तेव्हां आम्हांला समजलें, कीं, इकडले सर्व ब्राह्मणसुद्धां मांसाहारी आहेत! " आम्हांला मच्छीभात नको; आम्ही शाकाहारी आहों. तरी डाळभातच कर, " असें आम्हीं त्याला सांगितलें.

जेवण होऊन थोडी विश्रांति घेतल्यावर आम्ही पुढें मार्गस्थ झालों, तों पांच साडेपांचाच्या सुमाराला **उरी** या गांवीं आलों. रात्रीचा आमचा मुक्काम येथें व्हावयाचा होता. **रावळपिंडी**हून निघाल्याला आज तिसरा दिवस असून आज सकाळपासून संध्याकाळपर्यंत आम्ही सुमारें छत्तीस मैलांचाच प्रवास केला. कारण, **कोहाल्या**पासून आपल्या ध्यानांत न येतां मार्ग वरवरच जात असतो. **कोहाला** समुद्रसपाटीपासून दोन हजार फूट आहे तर **उरी** हें ठिकाण सुमारें पंचेचाळिसशें फूट उंच आहे. **उरी** हें गांव बरेंच मोठें आहे, व येथें सपाटीहि पुष्कळच असून तीमध्यें भातशेती रगड आहे. यामुळें येथें थोडें तरी खुलास वाटतें, व **कोहाल्या**कडे जातांना पाताळांतील तुरुंगाकडे जातों कीं काय, असा जो भास होतो, तसा इकडे होत नाहीं. ज्याप्रमाणें **डुमेल** येथें **अपटाबाद**कडून येणारा रस्ता या रस्त्याला येऊन मिळतो त्याप्रमाणें **झेलम स्टेशन**पासून काश्मीराकडे येणारा एक रस्ता **उरीस** याच रस्त्याला येऊन मिळतो.

**उरी**लाहि आम्ही 'हिंदु स्वयंपाकगृहां' तच उतरलों होतों. जागेचें भाडें, चौपाईचें भाडें, दिवाबत्तीचें भाडें, व जेवणाखाणाचा खर्च सर्व मिळून सरासरी माणशीं रुपया दीड रुपया येतो. मुंबईच्या उपाहारगृहांत ज्याप्रमाणें पदार्थांच्या किंमतीची यादी असते, त्याप्रमाणें या गृहांतून संस्थानच्या अधिकाऱ्याच्या सहीची यादी असते; यामुळें परकी माणसाला आकार देतांना सोयीचें पडतें.

दुसऱ्या दिवशीं पुनः आम्ही मार्गस्थ झालों. **उरी**च्या आसपास जी ऐसपैस सपाटी आहे, तिचा वचपा काढण्याकरितां कीं काय, **उरी** टाकल्यावर **वितस्ता** नदी पुनः भयंकर पहाडाचा भेद करून आली आहे, असें दिसूं लागतें. दोन्ही बाजूंना देवदार व इतर प्रचंड वृक्ष यांनीं आच्छा-

दित असलेले व सात-सात हजार फूट उंच असलेले कडे असून या अत्यंत चिंचोळ्या दरींतून नदीला जावें लागल्यामुळें नदी चवताळलेल्या वाघिणीसारखी डुरकण्या फोडीत व उड्या घेत जाते. कोठें कोठें तर किल्ल्याच्या तटाप्रमाणें दोहींकडे सारखे तुटलेले कडे असून फक्त लहानशा दरवाजाप्रमाणें असलेल्या एका भगदाडांतून नदीचा प्रवाह जातो. या ठिकाणचा देखावा विलक्षण भयप्रद वाटतो.

अशा या निबिड दरींत **महोरा** म्हणून काश्मीरच्या महाराजांच्या राज्यांतलें वीज उत्पन्न करण्याचें स्टेशन लागतें. अशा या भयंकर दरींत एका लहानशा दुकानांत विजेचा दिवा पाहिला, म्हणजे विलक्षणच्च अचंबा वाटतो, व अर्वाचीन सुधारणा आणि तिनें उत्पन्न केलेल्या सुखसोयी यांचा कोठेंकोठें शिरकाव झाला आहे हें पाहून मन एक प्रकारें थक्क होऊन जातें! **नैनिताल** पाहिलें म्हणजे अशीच भावना मनांत येते; कोठें हिमालयांतील दऱ्याखोऱ्या व पहाड, आणि कोठें यूरोपांत तयार झालेल्या विजेच्या सोयी! पण अशासारख्या ठिकाणीं त्यांचा हा संगम पाहून अर्वाचीन शांततेच्या काळाचा महिमा केवढा आहे, हें मनांत आल्यावांचून रहात नाहीं.

**महोरा** टाकून पुढें गेलें म्हणजे **रामपुर** म्हणून एक गांव लागतें. येथें आम्ही फराळाकरितां थांबलों. फराळ आटोपून येथून अकरासाडेअकरा वाजतां आम्ही निघालों ते **बारामुल्ला** येथें दोनअडीचच्या सुमाराला आलों. **रामपुर** सोडल्यापासून आतां ही दरी संपेल, आतां ही दरी संपेल, असा कित्येक वेळां भास होई, पण प्रत्येक वेळेला आमची फसगत होई! **बारामुळ्याच्या** आधीं एक खेडें लागून तेथें सभोंवतालच्या टेंकड्या लहानलहान होऊन संपत आल्या आहेत, असें आम्हांला दिसलें. तेव्हां "हेंच का **बारामुल्ला**?" असें आम्हीं आमच्या टांगेवाल्याला विचारलें. पण 'जरा थांबा म्हणजे येईल,' असें त्यानें आम्हांला सांगितलें. लवकरच आम्ही बऱ्याच उंच अशा टेंकड्यांच्या बाजूकडे जाऊं लागलों, व आतां पुढें रस्ता नाहीं, असें आम्हांला वाटलें, तोंच त्या टेंकड्यांचा भेद करून

नदी चालली आहे, व तिच्याच कडेनें रस्ता चालला आहे, असें आम्हांला आढळून आलें. जणूं काय द्वारासारखा असलेला हा भाग मागें टाकून आम्ही आंत पाऊल टाकतों, तों **वितस्तेचें** पात्र केवढें तरी प्रशस्त व प्रशांत झालेलें दृग्गोचर होऊन आमच्या समोर सपाटच्यासपाट भूमिभाग दिसूं लागला. तेव्हां हाच काश्मिरचा सपाट प्रदेश, अशी आम्हांला प्रचीति आली. **बारामुळा** या गांवाला ' काश्मीरचें किंवा नंदनवनाचें द्वार ' असें म्हणतात, तें यथार्थ आहे, असें तत्क्षणीं दिसून येतें. आजचा राहिलेला सर्व दिवस व रात्र आमचा मुक्काम येथें व्हावयाचा होता म्हणून आम्हीं येथील हिंदुस्वयंपाकगृहाचाच आश्रय केला, हें सांगावयाला नकोच.

याप्रमाणें पंजाबच्या सपाट, सुपीक पण अपादप व म्हणूनच कंटाळवाण्या प्रदेशांतून येऊन प्रचंड पर्वतराजि ओलांडून पुढें दऱ्या खोऱ्यांतून, नदी-नाल्यांतून, रानांवनांतून, **झेलमनदीच्या** नागमोडी प्रवाहाच्या बाजूबाजूनें बिकट मार्ग काढीतकाढीत, काश्मिरच्या सपाट, सुपीक, सुंदर व प्रच्छाय प्रदेशांत प्रवेश करून आम्ही येथपर्यंत सुखरूप पोंचलों याबद्दल आमच्या मनाला फार आनंद झाला यांत नवल नाहीं.

आम्ही चहा वगैरे घेतों तोंच तेथें चेरी नांवाचीं फळें मिळतात तीं विकावयाला आलीं. काश्मिर प्रांत थंड देशांतील फुलें व फळें यांकरितां फार प्रसिद्ध आहे, याचें प्रत्यंतर आम्हांला रस्तोरस्तीं येत होतेंच, पण त्या गोष्टीचें हें आणखी एक प्रत्यंतर आम्हांला मिळालें. चेरी हीं फळें आपल्या इकडच्या जांभळापेक्षां किंचित् लहान असतात, पण यांचा आकार लांबट नसून करवंदासारखा वाटोळा असतो. फळें गोडीला चांगलीं असतात. हीं फळें थोडीशीं खाऊन आम्हीं हा गांव पहावयाला निघालों.

हा गांव **वितस्तेच्या** दोन्हीं तीरांवर वसलेला असून येथें नदीवर एक पूल आहे. त्या पुलावरून आम्हीं पलीकडे गेलों. येथें नदीचें पात्र रुंदावलें असून ती अगदीं संथपणें चालली आहे असें दिसलें. आम्हीं

झेलम स्टेशनवर प्रथमतः ही नदी पाहिली, तेव्हां ती अशीच शांत होती; पण तिचें पात्र मात्र समुद्रप्राय दिसत होतें. **झेलम** स्टेशनपासून **बारामुळा** दोनशें मैलांच्या वर असेल. हा दोनशें मैलांचा नदीचा मार्ग प्रचंड हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यांतून व डोंगरपहाडांतून आलेला आहे. या सर्व भागांत या नदींतून नावा चालविणें अशक्य आहे. कारण नदीचा वेग विलक्षण आहे. पण ही नदी उगमापासून थोड्याच अंतरावर नावा चालण्याला योग्य होते, व तेथून **बारामुळा**पर्यंत नावा चालतात. पुढें नावा बंद होतात. मग पुढें **झेलम** स्टेशनपासून नावा चालतात. अशीं या नदीचीं बहुविध रूपें पाहून आम्हांला 'बहुरत्ना हि वसुंधरा' या म्हणीची आठवण झाली, व 'बहुरूपा हि वितस्ता' असें या म्हणीचें रूपांतर मनांत आलें. **बारामुळा** हा गांव मोठा आहे; पण गांवांत घाण बरीच दिसली. बहुतेक वसती मुसलमानांची आहे असें दृष्टोत्पत्तीला आलें. गांवाच्या टोंकापर्यंत जाऊन आम्ही परत बिऱ्हाडीं आलों.

येथून **श्रीनगर**ला जावयाला दोन मार्ग आहेत. एक खुषकीचा मार्ग, हा थेट पूर्वेकडे असून रस्ता अगदीं सरळ व सपाटच आहे. दुसरा जलमार्ग. हा मात्र अर्धलंबवर्तुळाकार आहे. **बारामुळा** येथें नावेंत बसलें, कीं, **श्रीनगरांत** थेट नावेनें जातां येतें. कारण, **श्रीनगर झेलम** नदीच्या कांठावर वसलें आहे. **बारामुळा**पासून दहाबारा मैलांवर ही नदी **वुलर** नांवाच्या सरोवराला मिळते. या सरोवराचा परिघ तीस मैलांचा असून हिंदुस्थानांत एवढें मोठें सरोवर दुसरें नाहीं. येथील देखावा फारच रमणीय आहे. पण या मार्गानें **श्रीनगर**ला जावयाला तीन दिवस लागतात. आम्ही खुषकीच्या मार्गानें गेलों.

गांव पाहून आल्यावर आम्ही श्रीनगराकडे जाणाऱ्या रस्त्यानें पहात पहात चाललों. या रस्त्याच्या दोन्ही बाजूंना 'पॉपलर' नांवाचीं झाडें सारखीं लावलेलीं आहेत. यामुळें रस्त्याची अपूर्व शोभा दिसते. पॉपलर (इकडे याला 'सफेदा' म्हणतात.) हें झाड पोफळीच्या झाडाप्रमाणें अगदीं सरळ वाढत जातें. पण पोफळीच्या बुंध्याला करवे पडत जातात,

तसे याला नसतात. याची साल पांढरी शुभ्र असते, व बुंध्यापासून दहाबारा फूट उंचीपर्यंत याला पानें नसतात. तेथून वर पानें व खांद्या फुटतात. पण खांद्या आडव्या फुटत नाहींत, तर सुरूच्या झाडाप्रमाणें बुंध्याला चिकटून वरवर जातात. या झाडाचीं पानें कांहींशीं पिंपळाच्या पानां-सारखीं असून त्यापेक्षां थोडीं लहान असतात, आणि नव्या पालवीप्रमाणें सतेज व पोपटी हिरव्या रंगाचीं असतात. हे वृक्ष विलक्षण म्हणजे पन्नास-पासून शंभर फूट इतके उंच सरळसोट वाढत जातात. यांना फांद्या वगैरे वेड्यावांकड्या फुटत नसल्यामुळें हे वृक्ष जवळ जवळ लावतां येतात. आम्हीं मोजून पाहिलें, तों दोन वृक्षांमध्यें दोनदोन हातांचें अंतर होतें. अशा तऱ्हेनें अगदीं जवळजवळ व सारख्या अंतरानें रस्त्याच्या दोन्ही बाजूंना हे वृक्ष लावल्यामुळें रस्त्याची शोभा कांहीं विलक्षणच दिसते. काश्मीरांत प्रथमतः प्रवेश करणाराला या रस्त्याची शोभा म्हणजे अदृष्टपूर्वच होय, यांत शंका नाहीं. या रस्त्याकडे खरो-खरींच सारखें पहात रहावेंसें वाटतें.

आम्ही सारखे पुढेंपुढें चाललों. दोन्ही बाजूंना ते उंचउंच वृक्ष, सुता-सारखा जाणारा रस्ता, अगदीं सपाट प्रदेश, रस्त्याच्या बाजूला केव्हां-केव्हां पाण्याचे पाट व त्यांत निरनिराळ्या रंगांचीं फुलें हा देखावा कितीहि वेळ पाहिला तरी मनाची तृप्ति होत नाहीं. जातांजातां आम्हांला एक लहानसा उंचवटा लागला, म्हणून सभोंवारची शोभा पहाण्याकरितां आम्ही त्यावर चढलों, तों दुसराच अपूर्व देखावा आमच्या दृष्टिपथांत आला. सर्व भूमिभाग पांढऱ्या शुभ्र पर्वतराजींनीं वेष्टिलेला आहे, असें दिसून येऊन जिकडे दृष्टि फेंकावी तिकडे हे पांढरे शुभ्र पर्वतच दृग्गो-चर होऊं लागले. चांदीचा मुलामा दिलेल्या वस्तु जशा चकाकतात त्याप्रमाणें या टेंकड्या सायंकाळच्या वेळीं विशेषच चकाकतात. काश्मीर हा प्रदेश म्हणजे हिमालयांकित एक कोट आहे, याची प्रचीति या ठिकाणीं आम्हांला आली. हा देखावा आम्ही किती वेळ तरी पहात होतों; पण आतां उशीर झाल्यामुळें आम्ही परत फिरलों, व आमच्या उतरण्याच्या जागीं आलों.

आम्हीं बारामुळा येथें ता. २४ मे रोजीं दोन प्रहरीं पोहोंचलों हें मागें सांगितलेंच आहे. येथून श्रीनगर चवतीस मैल म्हणजे टांग्याचा पांच तासांचाच प्रवास राहिला होता. तो प्रवास आम्हीं पंचवीस तारखेस सकाळींच करून **श्रीनगरास** जाणार होतों. **श्रीनगरास** आम्ही संस्थानचे विजेच्या खात्यांतील एंजिनीयर रा. बोस या नांवाच्या बंगाली गृहस्थाकडे उतरणार होतों. त्यांना तेथें बिजली बाबू म्हणतात. पंचवीस मे पासून आम्हीं देशीं परत येईपर्यंत पुढील हकीकत स्थलक्रमानें न देतां दिनक्रमानें देण्याचा विचार केला आहे. अर्थात् आमची रोजची रोजनिशीच वाचकांस आम्ही सादर करणार आहों व ती ता. २५ मे सकाळपासून देणार आहों. पण त्याचे आधीं **श्रीनगरची** सामान्य स्थिति व तेथल्या आमच्या राहण्याची सोय यांची हकीकत देणें वावगें होणार नाहीं.



# प्रकरण २ रें.



## श्रीनगर.

आमच्या आगमनाची बोसबाबूंना आधींच वर्दी असल्यामुळें आम्ही पोहोंचल्याबरोबर आमची स्नानभोजनादि सर्व व्यवस्था उत्तम झाली. आमचें जेवणखाण आटोपत आहे, तोंच बिजलीबाबू ऑफिसांतून घरीं आले, आणि त्यांनीं आमच्या प्रवासाबद्दलची चवकशी करून 'आपल्या रहाण्याची व्यवस्था श्रीयुत प्रोफेसर अप्रकाशचंद्र मेहता या नांवाच्या दुसऱ्या बंगाली बाबूंच्या बिऱ्हाडीं केली आहे,' असें आम्हांला सांगितलें. श्रीयुत मेहता व श्रीयुत घोष नांवाचे दुसरे एक बंगाली बाबू एकत्र रहात असत, आणि दोघेहि सडेच असल्यामुळें त्यांच्या बिऱ्हाडीं जागाहि पुष्कळ होती; शिवाय, ते शाकाहारीहि होते. पडदानशीन कुटुंबवत्सल बाबूंच्या बिऱ्हाडापेक्षां आमच्या रहाण्याची ही दुसरी व्यवस्थाच आम्हांला फार पसंत पडली, आणि अशी व्यवस्था केल्या-बद्दल आम्हीं बिजलीबाबूंचे आभार मानले.

आमच्या प्रवासाबद्दल चवकशी करून मग बिजलीबाबूंनीं आमचा काश्मीरांत किती दिवस रहाण्याचा बेत आहे, याबद्दल विचारपूस केली. 'सात आठ दिवसांपेक्षां जास्त दिवस आम्हांला रहावयाला सवड नाहीं.' असें जेव्हां आम्हीं बाबूमजकुरांना सांगितलें, तेव्हां ते मोठ्या आश्चर्यानें उद्गारले "काय म्हणतां आपण ? आपल्या ठिकाणाहून दीडदोन हजार मैलांच्या पल्ल्यावर येऊन व इतका पैसा खर्च करून आपण आलांत, आणि आतां येथें सातआठ दिवसच मुक्काम करणार ! येथें येणारे लोक इतक्या श्रमाचा व दगदगीचा प्रवास करून आल्यावर निदान दीड महिना तरी राहिल्याखेरीज परत स्वदेशीं जात नाहींत. शिवाय, काश्मीर हा एक मोठा प्रांत आहे. यामध्यें कितीतरी सुंदर सरोवरें आहेत; किती-

तरी वनश्रीनें भरलेलीं दऱ्याखोरीं आहेत; येथें किती तरी स्फटिका-सारख्या पाण्यानें तुडुंब वहाणाऱ्या नद्या आहेत, आठदहा हजार फुटांच्या वर उंच असलेल्या पुष्पवाटिका व शीतल निवासस्थानें किती-तरी आहेत; यांपैकीं तुम्ही सातआठ दिवसांत काय काय पहाणार ?"

या आशयाचें बाबूसाहेबांचें भाषण ऐकून एकाद्या श्रीमंत मनुष्याच्या मनाची कुबेराची संपत्ति ऐकून जी स्थिति होईल, तीच आमच्या मनाची झाली. आम्ही काश्मीराला आलों, ते अर्थात् तो प्रांत वनश्रीचें माहेरवर आहे असें समजूनच आलों; पण तो प्रांत निवळ झटकाफटकी पहावयाला सुद्धां महिनापंधरा दिवस पुरणार नाहींत, असें ऐकून आम्हांला थोडेंसें वाईट वाटलें. पण आतां त्या वाईट वाटण्याचा उपयोग काय होता ? आम्हांला जास्त रहावयाला तर सवड नव्हती. तेव्हां आहे त्यांत जितकें पाहून घेतां येईल तितकें पाहून घ्यावयाचें, असा आम्हीं आपल्या मनाशीं निश्चय केला, आणि आमच्या मुक्कामाचे आम्हीं दोन भाग करण्याचें ठरविलें. पहिल्या भागांत **श्रीनगर** व त्याच्या आसपासचीं प्रेक्षणीय स्थलें पहावयाचीं, आणि दुसऱ्या भागांत श्रीनगराच्या बाहेरील कांहीं स्थलें पहावयाचीं, व मग लागलीच देशीं परतावयाचें असा आम्हीं कार्यक्रम ठरविला.

**श्रीनगर** हें काश्मीर संस्थानच्या राजधानीचें शहर आहे. हल्लीं काश्मीर हें जोडसंस्थान आहे. येथले महाराज **काश्मीर** व **जम्मू** या संयुक्त संस्थानांचे अधिपति आहेत. **जम्मू** हें ठिकाण हिमालयाच्या पायथ्याला व पंजाबच्या उत्तरेला आहे. **जम्मू** हा हल्लीं संस्थानचा एक परगणा आहे. काश्मिरचे महाराज **जम्मू** येथें हिंवाळ्याचे चार महिने रहातात, आणि बाकीचे आठ महिने श्रीनगरला रहातात.

काश्मीर हा या संयुक्त संस्थानांचा एक परगणाच आहे. हा परगणा हिमालयवलयांकित असा एक सपाट प्रदेश आहे. ही सुमारें ऐशीं मैल लांब व सुमारें तीस मैल रुंद अशी एक सपाट पट्टी आहे, आणि या सपाट पट्टींतून **झेलमनदी** वाहत जाऊन **बारामुळा** येथें हिमालयाला फोडून

वांकणावांकणानें वहातवहात पंजाबांत उतरली आहे. या पट्टीच्या सरा-सरीं मध्यावर **श्रीनगर** ही राजधानी वसलेली आहे.

ज्याप्रमाणें युरोपियन प्रवासी काश्मीरला 'हिंदुस्थानचें नंदनवन' म्हणतात, त्याचप्रमाणें ते **श्रीनगराला** युरोपांतील **व्हेनीस** शहराची उपमा देतात. सकृद्दर्शनीं हें साम्य म्हणजे 'कोठें इंद्राचा ऐरावत व कोठें शामभटाची तट्टाणी' या ह्मणीसारखें भासतें. कारण कोठें आड्रि-याटिक समुद्रवलयांकित **व्हेनिस** शहर, तर कोठें हिमालयवलयांकित **श्रीनगर** शहर! कोठें समुद्रसपाटीवर वसलेलें व नदीच्या प्रवाहानें समुद्रांत आलेल्या मातीच्या गाळाचें बनलेलें **व्हेनिस**, तर कोठें समुद्रसपाटी-पासून पांच हजार फूट उंचीवर वसलेलें व सरोवराचें पाणी ओसरून बनलेलें **श्रीनगर**! कोठें एका काळीं आशिया व आफ्रिका या दोन खंडांच्या व्यापाराचें केन्द्र असलेलें **व्हेनिस**, तर कोठें हिमालयाच्या प्रचंड तटानें जगाच्या दळणवळणाला पारखें झालेलें **श्रीनगर**! कोठें यूरोपांतील वास्तुकलेचें माहेरघर मानलेलें **व्हेनिस**, तर कोठें झोंपड्या-वजा साध्या व गलिच्छ घरांनीं भरलेलें **श्रीनगर**! सारांश, किती तरी बाबतींत या दोन शहरांत वैषम्य आहे! तरी पण एका बाबतींत या दोन शहरांत विलक्षण साम्य आहे, व त्यामुळेंच ही उपमा अयथार्थ वाटत नाहीं. ती बाब म्हणजे शहरांतील व शहराच्या आसपासचे दळणवळणाचे मार्ग आणि त्यांचीं साधनें हीं होत. **व्हेनिस** शहर हें समुद्राच्या कांठीं एका मोठ्या नदीच्या मुखाशीं सांचलेल्या गाळाच्या घनीभवनानें व दृढी-भवनानें बनलेलें आहे. त्या शहराचे निरनिराळे जमिनीचे टापू अगर बेटें झालेलीं आहेत, आणि मध्येंमध्यें पाणी व पाण्याचे पाट आहेत. **व्हेनिस** शहराचे 'ग्रांदेकनाल' या कालव्यानें दोन भाग झालेले असून या कालव्याला हजारों पाट काढलेले आहेत. यामुळें सर्व शहरभर काल-वेच कालवे असून या कालव्यांचा रस्त्यांप्रमाणें उपयोग होतो. म्हणजे ज्याप्रमाणें इतर शहरांत गाड्या, घोडे, ट्रामवे, हीं दळणवळणाचीं साधनें आहेत, त्याप्रमाणें व्हेनिसमध्यें 'गंडोला' नांवाच्या होड्या, जॉली

बोटी, आगबोटी हीं **दळणवळणाचीं मुख्य** साधनें आहेत, आणि यामुळें पहिल्यानें पहाणाराला हा एक अपूर्वच अनुभव येतो! त्यासारखीच **श्रीनगर**ची स्थिति आहे.

हें शहर **झेलमनदी**च्या दोन्ही तीरांवर सुमारें तीन मैल असें दुतर्फा वसलेलें आहे. या नदींत लहानमोठ्या नावा चालतात. शिवाय शहराच्या उत्तरेला एक अर्ध्या मैलावर **दाल** नांवाचा मोठा सुंदर तलाव आहे, व हा तलाव **झेलमनदी**ला एका कालव्यानें जोडलेला आहे; तसेंच बऱ्याच मैलांवर **मानसबल म्हणून** एक सरोवर आहे, त्याचाहि **झेलमनदी**शीं एका कालव्यानें संबंध जोडलेला आहे. आणखी शहराच्या खालीं **दुधगंगा** नांवाची नदी झेलमला येऊन मिळाली आहे. शिवाय **झेलम**-नदीला पूर येऊन शहरांतील घरांत पाणी शिरतें, त्याचा बंदोबस्त करण्याकरितां शहराच्या वरच्या बाजूला **झेलम** नदीचा एक मोठा पाट काढून तो अर्धवर्तुलाकार घेऊन शहराच्या मधोमध नदींत मिळवून पुनः दुसऱ्या बाजूला काढून शेवटीं शहराच्या खालीं नदींत मिळविला आहे. या नागमोडी कालव्याच्या योगानें येथें **झेलमनदी** आडव्या पाडलेल्या 'क' सारखी दिसते, व शहरांतील घरें याच्या आसपास वसलेलीं आहेत. यामुळें शहरांतील कोणत्याहि ठिकाणापासून नदी अगर कालवा आठदहा मिनिटांच्या चालीच्या आंत आहे. अर्थात् शहरांत निरनिराळ्या ठिकाणीं जाण्याचें मुख्य साधन म्हणजे होड्या होत. अशा हजारों होड्या श्रीनगर शहरांत आहेत. ज्याप्रमाणें आपण इतर शहरीं गाडीच्या अड्ड्यावर गाडी ठरविण्याला जातों, त्याप्रमाणें येथें कोठें जावयाचें असल्यास होड्यांच्या अड्ड्यावर जावयाचें, व तेथून होडींत बसून इष्ट ठिकाणीं पोहोंचावयाचें! या होड्यांना इकडे 'शिकारा' म्हणतात. **घारापुरीस** जावयाचें असल्यास मुंबईला ज्याप्रमाणें जॉलीबोटी असतात तशा तऱ्हेचे हे 'शिकारे' असतात. मात्र या होड्या फार **लांबट** असतात. नदीचें व कालव्याचें पाणी संथ असल्यामुळें या होड्या खालीं सपाट असतात.

तारीख २५ मे १९१५ रोजीं पहांटेला पांच वाजतां निघून आम्हीं चवतीस मैलांचा प्रवास सुमारें सात तासांत आक्रमिला. हा सर्व प्रवास अगदीं सपाट अशा प्रदेशांतून होता. रस्त्याचे दोन्ही बाजूंना ' सफेदा ' या सुंदर व उंच वाढणाऱ्या झाडांची रांगचरांग सारखी लागलेली होती; यामुळें आपण एकाद्या लतांनीं व्याप्त अशा सुंदर मंडपांतूनच जात आहों, असा भास होत होता; पुष्कळ ठिकाणीं रस्त्याच्या दोन्ही बाजूंना खंदकाप्रमाणें पाट दृष्टीला पडले. व त्यांत पुष्कळ पुष्पांनीं ओथंबलेलीं पाणझाडें आणि पाणवेली दृग्गोचर होत होत्या; म्हणून सर्व प्रदेश जणूं काय एक बागच बाग आहे, असें मनाला वाटत होतें; श्रीनगरच्या जवळजवळ येऊं लागलों, तसतशा फळझाडांच्या बागा व फुलझाडांच्या बागा लागूं लागल्या.

बारांपासून तीनपर्यंत आमचें स्नान भोजन वगैरे आटोपलें. बिजलीबाबूंच्या सांगण्यावरून राहिलेल्या तीनचार तासांत आम्हीं रेशमाचा कारखाना आणि जुम्मामशीद हीं पहावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें टांगा ठरवून लागलेच निघालों, तों रेशमाच्या कारखान्याशीं आलों.

कारखान्याचें आवार मोठें आहे; पण कारखान्याची इमारत फारशी मोठी दिसली नाहीं. कारण, या कारखान्याचा बराच मोठा व तोहि विणण्याचा भाग अग्निनारायणाच्या भक्षस्थानीं पडला, व तो भाग अजून बांधला नाहीं, असें कळलें. सध्यां त्या कारखान्यांत रेशमाच्या किड्यांनीं तयार केलेल्या कोशापासून फक्त रेशमी सूत तयार होतें, व तें युरोपांत पाठविण्यांत येतें, असें आम्हांला सांगण्यांत आलें. आमच्या दुर्दैवानें आज कारखान्याला लवकर सुट्टी झाली होती, यामुळें आम्हांला कारखाना चालू असतांना पहावयाला मिळाला नाहीं. तरी पण आम्ही सर्व दालनें हिंडलों. व तयार झालेल्या रेशमाचे नमुने पाहिले. तसेंच, इटली देशांतून आलेल्या रेशमाच्या किड्यांच्या अंड्यांच्या पेट्यांच्या पेट्या आम्हीं तेथें पाहिल्या. या संस्थानचा रेशमाचा हा कारखाना फारच

मोठा आहे, व त्यापासून संस्थानला वर्षाचें दहाबारा लाखांचें उत्पन्न होतें, असें समजलें.

हा कारखाना पाहून झाल्यावर आम्ही परतलों, आणि जुम्मामशीद पहावयाला निघालों. रेशमाचा कारखाना **झेलम** नदीच्या उजव्या तीराला आहे, तर जुम्मामशीद डाव्या तीराला असून ती श्रीनगरच्या जुन्या वस्तीच्या अगदीं मध्येंच आहे. यामुळें **झेलम**नदीवरचा पूल ओलांडून आम्हांला यावें लागलें. आम्ही पूल ओलांडून शहरांतून जाऊं लागलों, तोंच आम्हांला जुन्या काशीची आठवण झाली. आतां रस्ते अगदीं बोळांडीवजा लागूं लागले. एक टांगासुद्धां जाण्याची मुष्कील इतका रस्ता लहान होता. तसेंच, बोळ आडवेतिडवेहि फार होते. घरेंहि अगदीं भिकार, गलिच्छ असून जिकडेतिकडे रस्त्यावर घाण आणि केरकचरा पडलेला होता. त्यामुळें रस्त्यांतून जातांना वारंवार दुर्गंधिहि येत होती.

वाटेनें दृष्टीला पडणारे लोकहि बरेच गलिच्छ दिसले. येथें बहुतेक मुसलमानांचीच वसती आहे. मधूनमधून मुसलमानी थाटाचाच पोशाख केलेले, पण गंधावरून हिंदु असे ओळखतां येण्यासारखे पंडित दृग्गोचर होत होते. शहराचा हा गलिच्छ भाग पाहून नंदनवनांतहि मधूनमधून उकिरड्याच्या जागा असतात, असें वाटलें. हा सर्व प्रांत व हें शहर नैसर्गिक सौंदर्यानें व वनश्रीनें इतकें ओतप्रोत भरलेलें असतां मनुष्य आपल्या आळसानें, आपल्या गलिच्छ सवईनीं, आपल्या वेडगळ कल्पनांनीं व आपल्या दारिद्र्यानें 'नंदनवनाला' सुद्धां 'नरक' तुल्य करून टाकूं शकतो, हें पाहून मनामध्यें एक प्रकारचा उद्वेग उत्पन्न झाला. '**नर करणी करे तो नरका नारायण हो जाय**' ही मनुष्याच्या कर्तृत्वाची साक्ष पटविणारी म्हण जशी खरी आहे, तशी 'मनुष्य आपल्या दुष्कृत्यांनीं अधोगतीलाहि आपणाला नेऊं शकेल,' हें म्हणणेंहि तितकेंच खरें आहे. एवढ्या सुंदर प्रदेशांत इतकें गलिच्छ शहर! हा विरोध आमच्या मनांत सारखा घोळत होता. जरी हा शहरचा भाग इतका गलिच्छ होता, तरी येथेंसुद्धां विजेचे दिवे दृष्टीला पडत होते, या

गोष्टीचा मात्र आम्हांला चमत्कार वाटला; पण या ठिकाणीं विजेचे दिवे रॉकेलच्या दिव्यापेक्षां स्वस्त पडतात, व म्हणूनच गरीबगुरीबसुद्धां हे दिवे वापरतात असें आम्हांला समजलें.

या गलिच्छ भागांतून आमचा रस्ता सरतां सरेना! पण शेवटीं आम्ही एका ठिकाणीं थांबलों, आणि खंदकासारख्या भासणाऱ्या खोलगट जागेंतून जुम्मामशिदीच्या दारापाशीं आलों. येथें पुष्कळ मुसलमान फकीर व मुल्ला बसलेले होते, त्यांनीं आमच्या भोंवतीं गर्दी केली. हिंदूच्या तीर्थाचे ठिकाणीं जसे पंडये, तसेच हे लोक आम्हांला दिसले. पण त्यांच्या लगटीची पर्वा न करतां आम्हीं मशिदींत शिरलों.

ही सर्व मशीद लांकडी कामाची आहे, हा एक तिचा विशेष आहे. उत्तरहिंदुस्थानांतील सर्व मशिदी दगडी आहेत; पण येथली ही मुख्य मशीद लांकडी आहे. इमारत फार उंच आहे. लांकडी खांबांची रांगच रांग फार भव्य दिसते. वर छतहि लांकडी असून त्याचें नक्षीकाम सुंदर आहे. खांबांची उंची पाहून मात्र मनुष्य आश्चर्यानें अगदीं थक्क होतो. येथले खांब चाळीसपन्नास फुटांच्यावरच उंच असतील. हे खांब झाडाच्या एकाच सबंद खोडाचे आहेत, यावरून हिमालयांतील झाडांच्या प्रचंडपणाची कल्पना येते. परंतु या मशिदीचा बराच भाग पडका झाल्यामुळें एकंदर देखावा नयनमनोहर नाहीं, हें कबूल केलें पाहिजे.

ही मशीद प्रथम **शिकंदर लोदीनें** १४०४ सालीं बांधली. **तारापीड** नांवाच्या हिंदु राजानें इ. स. ६६९ मध्यें बांधलेल्या हिंदु देवळाच्या सामानानें ही मशीद बांधण्यांत आली. ही मशीद तीनदां अग्निनारायणाच्या भक्ष्यस्थानीं पडली होती. १४७९ मध्यें ती जळल्यामुळें पुनः बांधण्यांत आली. जहांगिराच्या कारकीर्दींत १६१९ सालीं पुनः तिला आग लागली, व पुनः ती बांधण्यांत आली. तिसऱ्यानें १६७४ सालामध्यें **औरंगजेब** बादशहाच्या कारकीर्दींत ती पुनः बांधली गेली. हल्लींची इमारत औरंगजेबाच्या वेळची आहे. इ. स. १८९३ मध्यें या मशिदीची

दुरुस्ती करण्याकरितां काश्मिरच्या महाराजांनीं बारा हजार रुपये दिले असून पुनः १९१२ सालीं त्यांनीं या कामाकरितां चाळीस हजार रुपये दिले. मशीद आम्ही पहावयास गेलों, तेव्हां दुरुस्तीचें काम चालू होतें, असें दिसलें. कारण, ठिकठिकाणीं परांच्या दृष्टीला पडत होत्या. सर्व मशिदीचें आवार बरेंच मोठें आहे. मशिदीचें आंगण २५४–२४४ फूट आहे. हें सर्व आम्ही पाहतों, तों बरीच संध्याकाळ झाली, म्हणून आम्हांला आमच्या बिऱ्हाडाकडे परत फिरणें भाग पडलें.

सुमारें साडेसात वाजतां आम्ही बाबू अप्रकाशचंद्र यांच्या बिऱ्हाडीं येऊन पोहोंचलों. रात्रीं जेवणखाण झालें, व दुसऱ्या दिवशींचा कार्यक्रम ठरला. श्रीयुत घोषबाबू जपानांत जाऊन रेशमाच्या धंद्याची माहिती मिळवून आले असून सध्यां ते काश्मीरांत रेशमाच्या लागवडीच्या सुपरवायझरचें काम करीत होते. त्यांना त्यांच्या कामाकरितां **हारवान**-पर्यंत जावयाचें होतें. तेव्हां त्यांच्याच टांग्यांत आम्हीं जाऊन तिकडील प्रेक्षणीय स्थळें पाहून एकदीडच्या सुमाराला बिऱ्हाडीं परत यावें, असें ठरलें. याप्रमाणें बेत केल्यावर व इकडल्यातिकडल्या गप्पा मारल्यावर सुमारें दहा वाजतां आम्ही झोंपीं गेलों.

ता. २६ मे १९१५ रोजीं आम्ही सकाळींच उठलों, व चहापाणी घेऊन टांग्यांत बसलों. आम्ही एकंदर चार माणसें होतों. तिघे टांग्यांत बसलों, व श्रीयुत घोष यांनीं आपली पायगाडी बरोबर घेतली. कारण, त्यांना मध्येंच बाजूच्या एका खेड्याची तपासणी करावयाला जावयाचें होतें.

**हारवान** हें ठिकाण श्रीनगरच्या उत्तरेला ११ मैलांवर आहे. या ठिकाणाहून शहरांत नळाचें पाणी आणलेलें आहे. जातांना रस्ता बराच उंचसखल आहे. **हारवान** हा एक स्वाभाविक तलाव आहे. याच्या तिन्ही बाजूंना प्रचंड पर्वत आहेत. ते इतके उंच आहेत, कीं, मे महिन्यांत-सुद्धां डोंगराच्या घळींत अजून बर्फ दृग्गोचर होत होतें. बर्फाच्या घसरण्यानें

व वितळण्यानें डोंगरांच्या बाजूंना पडलेल्या खुणा वर जागोजागीं दिसत होत्या. याप्रमाणें तीन बाजूंना स्वाभाविक भिंती असल्यामुळें फक्त दक्षिणेच्या बाजूला बंधारा बांधावा लागला आहे.

या तलावांत डोंगरांवरील बर्फाचें वितळलेलें पाणी सांठतें. येथून शहराकरितां **दाल** तलावामधून नळ नेले आहेत. तलावांत सांठणारें फाजील पाणी एका मोठ्या मोरींतून सोडून दिलें आहे. व या पाण्याचेच पाट **दाल** सरोवराच्या आजूबाजूच्या बागांना नेले आहेत. तलाव कांहीं फार मोठा नाहीं. पण येथला देखावा फार सुंदर आहे, व तो कांहींसा **नैनितालच्या** सरोवराच्या देखाव्यासारखा दिसतो. मात्र या डोंगरावर वसती मुळींच नाहीं. यामुळें प्रदेश निर्जन व भयाण वाटतो. तसेंच, **हारवानच्या** सभोंवारच्या डोंगरावर झाडीहि **नैनितालच्या** इतकी दाट नाहीं. **हारवानच्या** दक्षिणेकडल्या बंधाऱ्यावर जिकडे तिकडे गुलाबाची रांगची रांग लावून दिली आहे. हे गुलाब कलमी आहेत. सर्व गुलाब फुलांनीं फुललेले होते. फुलांचा रंग, त्यांचा कोमलपणा व सतेजपणा हीं अवर्णनीय होतीं. व फुलेंहि हाताच्या बचकेइतकीं मोठीं होतीं. काश्मीर देशाला '**गुलाबाची भूमि**' म्हणतात, त्याची यथार्थता माझ्या ध्यानांत आली. कारण, या प्रांतांत रानटी व कलमी गुलाब रानोमाळ आहेत. गुलाबांचींच कुंपणें, गुलाबांचेच ताटवे, गुलाबांच्याच कमानी जिकडे तिकडे दृष्टीला पडतात.

**हारवान** तलावाचा सर्व बंधारा आम्हीं ओलांडला. तलावाचें पाणी अत्यंत स्वच्छ व निर्मळ दिसत होतें. जेथून जास्त पाण्याला वाट करून दिली आहे, तेथपर्यंत आम्ही गेलों. तेथें रेड्याच्या अंगासारखें पाणी धोधो करून पाटांतून वहात जात होतें. ही शोभा बराच वेळ आम्ही पहात राहिलों, व मग नाइलाज म्हणून येथून परतलों.

परत येतांना घोषबाबूंना आपलें नित्य व्यवसायाचें काम—म्हणजे रेशमाच्या किड्यांची तपासणी करावयाचें होतें. या संस्थानांत रेशमाचा सर्व धंदा सरकारचा आहे. म्हणजे उपज सरकार करतें असें नाहीं. तर रेश-

माच्या किड्यांचीं अंडीं सरकार इटलीमधून आणवितें, व तीं खेड्यांतील शेतकऱ्यांना फुकट दिलीं जातात. या अंड्यांपासून किड्यांची उपज कशी करावयाची, त्यांची वाढ कशी करावयाची, व किड्यांनीं कोशे घालीपर्यंत, त्यांची जोपासना कशी करावयाची, याबद्दल सरकारी अंमलदारांकडून माहिती शेतकऱ्यांना देण्यांत येते. शेतकऱ्यांच्या मेहनतीनें तयार झालेले कोश सरकार एका ठरीव भावानें त्यांच्याकडून विकत घेतें. तयार होणारे कोश दुसऱ्या कोणालाहि विकतां कामा नयेत, असा शेतकऱ्यांवर निर्बंध आहे.

घोष बाबूंबरोबर आम्ही पुष्कळ घरें हिंडलों व रेशमाचे हजारों किडे पाहिले. घरांतील थंड अशा जागेंत शेल्फवजा खुल्या कपाटांत हे किडे ठेवतात. त्यांना तुतीचीं पानें खाऊं घालतात. या रानांत तुतीचीं झाडें हजारों आहेत. यामुळें किड्यांना लागणारें अन्न शेतकऱ्याला फुकट मिळतें. या किड्यांना जास्त उष्णता सोसत नाहीं, किंवा फार थंडीही चालत नाहीं. तेव्हां उष्णतेचें कमीअधिक मान समजण्याकरितां प्रत्येक शेतकऱ्याला एक उष्णतामापक यंत्र देण्यांत येतें. या लोकांचीं घरें जरी झोंपडीवजा आहेत तरी या घरांना वरचे मजले आहेत. व त्या घरांना कांचेच्या तावदानाच्या खिडक्या आहेत. त्यांचा उपयोग त्या खोलींतील हवा सारख्या प्रमाणांत ठेवण्यांत होतो. तसेंच, कदाचित् हवेंत उष्णता जास्त झाल्यास त्या खोलींत बेताचें पाणी शिंपडून त्या पाण्याचें बाष्पीभवन घडवून आणून उष्णता कमी करण्यांत येते. याप्रमाणें या किड्यांची जोपासना आणि वाढ बरोबर होत आहे किंवा नाहीं, शेतकरी आपल्या किड्यांची योग्य काळजी घेत आहेत किंवा नाहींत हें पाहण्याकरितां, तसेंच किड्यांना होणाऱ्या रोगांची परीक्षा करून त्यांचा प्रतिकार करण्याकरितां सरकारनें या शास्त्रांतल्या तज्ज्ञांना इन्स्पेक्टर नेमिलें आहे, व रोज खेड्यांत जाऊन तपासणी करून येण्याचें त्यांचें काम आहे. घोष बाबूंचें हेंच काम असल्यामुळें आम्हाला अनायासेंच रेशमाच्या उत्पत्तीची सर्व कृति बारकाईनें पहावयास सांपडली.

याप्रमाणें खेडीं पहातपहात आम्ही परत येत असतांना घोष बाबूंनीं आम्हांला काश्मीरच्या महाराजांचा ट्राऊटमाशांचा मासेतलावाचा बाग दाखविला. काश्मीरांत ब्राह्मणसुद्धां सर्व हिंदु मांसाहारी व मत्स्याहारी आहेत. ट्राऊट हा मासा फार दुर्मिळ व अत्यंत स्वादिष्ट असल्यामुळें महाराजांनीं स्वतःकरितां व खाशा पाहुण्यांकरितां एका खेडेगांवांत या माशांच्या उपजेकरितां स्वतंत्र व्यवस्था केली आहे. या बागेंत दोनदोन फूट रुंदीचे व तीन चार फूट खोलीचे असे पाटच पाट बांधून काढलेले असून त्या पाटांतून पाणी खेळविलेलें आहे. या पाटांत हे मासे इतस्ततः फिरतांना आम्हाला दिसत होते. आमचे बंगाली मित्र मोठ्या कौतुकानें या माशांच्या स्वादिष्टपणाची तारीफ करीत होते. 'हे मासे फार महाग असल्यामुळें हें मासे खाण्याचें फारच थोड्यांच्या नशिबीं येतें,' असें ते म्हणाले. कारण, या माशांना सहा रुपये पौंडप्रमाणें किंमत येते. अर्थात् एका माणसानें एक एका पौंडाचा मासा खाल्ला, तरी त्याच्या जेवणाची किंमत सहज सहा रुपये होते. 'असें सहा रुपये किंमतीचें जेवण आपण आयुष्यांत एकदांच केलें आहे,' असें बाबूसाहेबांचे मित्र म्हणाले. असो.

याप्रमाणें घोष बाबूंचें स्वतःचें रोजचें काम संपल्यावर आम्ही आपल्या येथल्या मुख्य कामाच्या—प्रेक्षणीय स्थळें पहाण्याच्या—पाठीस लागलों. **श्रीनगरा**चा विशेष म्हणजे तेथल्या निरनिराळ्या बागा होत. शहराबाहेर व दाल सरोवरासभोंवतीं जिकडे तिकडे बागाच बागा आहेत; त्यांपैकीं '**शालीमार**,' **निषात**,' व **चष्मशाई**' या विशेष प्रसिद्ध असून फार रमणीय आहेत. म्हणून तेवढ्याच पहावयाचें आम्हीं ठरविलें होतें. व आजच्या कार्यक्रमांत त्यांपैकीं पहिल्या दोनच पहावयाचा आम्हीं बेत केला होता. त्याप्रमाणें **हारवान**कडून परत येतांना प्रथमतः **शालीमार** बाग लागते, म्हणून आम्हीं तीच प्रथम पाहिली. बागेचें प्रवेशद्वार भव्य नाहीं. तसेंच बागेच्या सभोंवार असलेली भिंतहि फारशी मोठी किंवा उत्तम तऱ्हेची बांधलेली नाहीं. खेडेगांवांतील एकाद्या पाटलाच्या घराभोंवतीं जशा प्रकारची तटवजा भिंत असते, तशीच ही दिसत होती. या



नं. ३ शालीमारबागेंतील कारंजीं पान ३४



नं. ४ शालीमारबागेंतील धबधबा पान ३५

बाह्य परिस्थितीमुळें या बागेबद्दल प्रथमतः फारसा अनुकूल ग्रह पहाणाऱ्याच्या मनांत होत नाहीं. पण बागेची एकएक मजगी चढून जसजसें आपण आंत जावें, तसतसा या बागेचा प्रचंडपणा, त्यांतील सुखसोयी, त्याची रचना व सौंदर्य यांची साक्ष मनाला पटत जाते. ही बाग ५९० यार्ड लांब व २६० यार्ड रुंद आहे. हिच्या एकावर एक अशा चार मजगी आहेत. बागेच्या मधोमध प्रत्येक मजगींत एकएक तलाव असून सर्व तलाव पाटानें जोडलेले आहेत, व कारंज्यांची रांगची रांग लागलेली आहे. या बागेला **हारवान** तलावाचें पाणी आणलेलें असून तें सर्व बागभर खेळविलेलें आहे. या पाण्याचे एका तलावांतून दुसऱ्या तलावांत पडणारे लहान लहान धवधवे केलेले असून शेवटीं सर्व पाणी दाल तलावांत सोडून दिलेलें आहे.

चवथ्या मजगीवर एक सुंदर ६५ फूट लांब व रुंद असा चबुतरा असून त्यावर दगडी मंडप उभारलेला आहे. याचे खांब काळ्या संगमरवरी दगडाचे असून त्यांवर सुबक नक्षीकाम केलेलें आहे. या मंडपाच्या सभोंवार पाण्याची पुष्करणी असून त्यांत एकंदर १४० कारंजीं आहेत. हीं सर्व कारंजीं चालू झालीं म्हणजे या ठिकाणाहून फारच अद्वितीय शोभा दिसते. अशा तऱ्हेच्या किती तरी बागांनीं सुशोभित झालेल्या या शहराला 'नंदनवन' हें नांव अन्वर्थक आहे, असें वांटल्याखेरीज रहात नाहीं. या बागेंत 'चिनार' नांवाचीं पुष्कळच झाडें आहेत. श्रीनगरच्या बहुतेक सर्व बागांत हीं झाडें असून झेलमनदीच्या कांठीं तर 'चिनारबाग' या नांवाची एक स्वतंत्र बागच आहे. हें झाड मूळचें परशियांतील आहे, व मोंगल लोकांनीं तें या प्रांतांत आणलें असें म्हणतात. या झाडाचा प्रचंडपणा, त्याची गर्द सांवली, त्याच्या पानांचा नाजूकपणा व सतेजता या गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज समजणें शक्य नाहीं. परशियन भाषेंत सुंदर स्त्रीच्या नाजुक हाताला 'चिनार' झाडाच्या पानाची उपमा देतात, असें आम्हांला सांगण्यांत आलें, व ही उपमा यथार्थ आहे, असें त्या झाडांचीं सुंदर पानें पाहून माझ्या मनांत आलें.

**शालीमारबाग जहांगीर** बादशहानें १६१९ सालीं तयार करविली. इ० स० १६३० मध्यें **शहाजहानाच्या** कारकीर्दींत ही आणखी वाढविण्यांत आली. **शालीमारबाग** ही दालसरोवराला एका सुंदर कालव्यानें जोडलेली आहे. हा कालवा एक मैल लांब व बारा यार्ड रुंद आहे, व कालव्याच्या दोन्ही बाजूंना मोठमोठ्या वृक्षांनीं परिवृत अशा हिरव्यागार पायवाटा आहेत. यामुळें श्रीनगरांत 'शिकाऱ्यां'त बसून या बागेपर्यंत जलमार्गानें जातां येतें.

ही बाग पाहून झाल्यावर आम्ही टांग्यांत बसलों, व **शालीमार**पासून अलीकडे दोन मैलांवर असलेल्या **'निषात'** बागेशीं आलों. या बागेचें प्रवेशद्वार **शालीमार**पेक्षां जास्त मनोहर आहे, व ही बाग दालतलावाच्या अगदीं नजीक असल्यामुळें **शालीमार**पेक्षां येथें दालसरोवराचा देखावा फारच रमणीय दिसतो. ही बागहि **शालीमार**इतकी म्हणजे ५९५ यार्ड लांब आहे. **शालीमार**पेक्षां या बागेची रुंदी थोडी जास्त म्हणजे ३६० यार्ड आहे. **शालीमार**ला चारच मजगी आहेत, तर या बागेला सात मजगी आहेत. शेवटची मजगी फारच उंच असून तिच्या मागें हजारों फूट उंचीचे कडे आहेत. यामुळें या मजगीवरून दालसरोवराच्या सर्व बागांचा व सभोंवारचा देखावा फार विस्तृत व विविध दिसतो. या बागेंत दोन मंडप आहेत. पहिला बागेच्या प्रारंभींच आहे, व दुसरा बागेच्या शेवटीं आहे. दोन्ही मंडप दुमजली असून त्यांचें सर्व काम लांकडी नक्षीचें आहे. दोन्ही मंडपांमध्यें पुष्करणी असून त्यांत कारंजीं आहेत. **शालीमार**प्रमाणें या बागेंतहि प्रचंड चिनारवृक्ष आहेत, व जिकडे तिकडे कारंजीं असून सर्व बागभर पाटाचें पाणी खेळविलेलें आहे. हें पाणी **शालीमार** बागेवरून इकडे आणलेलें आहे. या बागेच्या सौंदर्याबद्दलची एक मजेदार आख्यायिका येथें देणें अयोग्य नाहीं.

**'निषात'** बाग **जहांगीर** बादशहाच्या **नूरजहान** राणीचा भाऊ **आसफशहा** यानें बांधविली, व तो याच बागेंत रहात असे. इ. स. १६३३ मध्यें **शहाजहान** बादशहा बाग पहावयास आला होता.

शालीमार बागेपेक्षां सृष्टिशोभेच्या बाबतींत ही बाग सरस आहे, असें बादशहाला वाटलें, आणि 'ही बाग फारच आल्हादकारक आहे,' असें बादशहा तीनदां **आसफशहाला** म्हणाला. यांत बादशहाचा आशय असा होता कीं, **आसफशहानें** ती बाग आपणाला नजर करावी. पण **आसफशहा** मुग्ध राहिला. यामुळें बादशहाला मनांतून राग आला, व शालीमार बागेंतून या बागेला पाणी येतें, असें पाहून रागाच्या भरांत 'शालीमार बागेंतून दुसऱ्या कोणत्याहि बागेला पाणी जातां कामा नये' असा हुकूम बादशहानें सोडला. यामुळें **निषात** बागेचें सौंदर्य व वैभव नष्ट झालें. म्हणून **आसफशहाला** फार वाईट वाटलें. पण त्याला कांहींच करतां येईना. आपल्या बागेची ही दुर्दशा पाहून त्याचें मन खट्टू झालें व दुःखाच्या उद्वेगानें तो सुसकारे टाकीत बागेच्या एका कोंपऱ्यांत झोंपीं गेला. धन्याची अशी दुःखावस्था पाहून बागेंतल्या एका नोकराला त्याची कींव आली, व ज्या ठिकाणीं शालीमार बागेंतून येणाऱ्या पाटाला दट्ट्या घातला होता, त्या ठिकाणीं जाऊन तो दट्ट्या काढून त्यानें बागेंत पाणी सोडलें. त्याबरोबर बागेंत जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें. सर्व कारंजीं जोरानें नाचूं लागलीं, व धबधबे धो धो वाहूं लागले. **आसफशहा** त्या आवाजानें जागा झाला, व आपल्या बागेचें पूर्ववैभव पाहून आश्चर्यानें थक्क झाला. पण नोकरानें केलेल्या कृत्याची बातमी लवकरच कळल्यामुळें तो घाबरला, व त्यानें तो दट्ट्या पुनः बसवून बागेचें पाणी बंद केलें. ही बातमी बादशहाला कळली. तेव्हां बादशानें त्या नोकराला आपल्या समोर बोलाविलें. सर्वांना वाटलें, कीं, आतां त्या गरीब बिचाऱ्या नोकराचीं शंभर वर्षें भरलीं! याला कांहींतरी भयंकर शिक्षा होणार! बादशहानें त्या नोकराचें म्हणणें ऐकून घेतलें, व आपल्या धन्यावरील भक्तीबद्दल त्याची प्रशंसा करून त्यानें त्याचा बहुमान केला, व **शालीमार** बागेंतून **निषातबागे**करितां पाणी नेण्याच्या कायमच्या हक्काची सनद त्यानें **आसफशाहाला** करून दिली.

ही बाग पाहिल्यावर आम्ही लागलीच बिऱ्हाडीं परतलों. परत येतों तों एकाचा सुमार झाला होता. नंतर जेवणखाण आटपून संध्याकाळ-पर्यंत आम्हीं विश्रांति घेतली.

---

# प्रकरण ३ रें

## शंकरपर्वत



तारीख २७ मे—दुसऱ्या दिवशीं सकाळीं कायकाय पहावयाचें, याचा बेत आम्ही आदल्या रात्रीं ठरवीत असूं. त्याप्रमाणें ता. २६ रोजीं रात्रीं प्रो. अप्रकाशचंद्र मेहेता म्हणाले "दाल सरोवराच्या दरवाज्यावर जणूं काय जयविजयांप्रमाणें **हरिपर्वत** व **शंकरपर्वत** म्हणून दोन टेंकड्या आहेत. त्यांपैकीं **हरिपर्वत** ( सारिकादेवीच्या देवळावरून याला 'सारिका पर्वत' असेंहि म्हणतात. ) ही टेकडी उत्तरेस आहे व ती चारपांचशें फूटच उंच आहे. येथें एक लहानसा किल्ला आहे हा किल्ला **अकबरबादशहानें** इ. स. १५९०मध्यें एक कोट रुपये खर्च करून बांधला, असें तेथें असलेल्या पराशियन शिलालेखावरून कळतें; हल्लीं या किल्ल्याचा सरकारी तुरुंगासारखा उपयोग करितात. येथें एक देवीचेंहि देऊळ आहे; पण हें ठिकाण पहाण्यास परवानगी लागते, व हल्लीं तर परवानगी मिळण्यास बराच त्रास पडतो. दुसरी टेकडी **शंकरपर्वत** ही हजारअकराशें फूट उंच असून तिच्यावर एक शंकराचें देवालय आहे. येथून **श्रीनगराचा** व दालसरोवराच्या देखावा उत्तम दिसतो."

अप्रकाशचंद्रबाबूंचें हें भाषण ऐकून आम्ही **हरिपर्वत** पाहण्याचा विचार सोडून दिला. आणि सकाळीं **शंकरपर्वत** व टेकडीच्या दुसऱ्या बाजूला खालींच पण गांवापासून दोनतीन मैलांवर असलेलें '**पनरतन**' ांवाचें जुनें मोडकळीला आलेलें देऊळ पहाण्याचा निश्चय करून ाम्ही झोंपीं गेलों. त्याप्रमाणें पहांटेस उठून व चहापाणी करून **शंकरर्वताकडे** जावयाला आम्ही निघालों.

त्याप्रमाणें **जुन्नर** येथील **लेण्याद्रि** नांवाच्या डोंगराला '**लेण्याद्रि**' **सुलेमान डोंगर** अशीं हिंदु व मुसलमानी दोन नांवें आहेत,



नं. ८ शंकर पर्वत पान ४१

त्याचप्रमाणें श्रीनगरजवळच्या या पर्वतालाहि **शंकरपर्वत** व **तक्तई सुले-मान** अशीं दोन नांवें आहेत. हा पर्वत **श्रीनगर**च्या ईशान्येला असून **दाल**सरोवराच्या एका टोंकाला लागून आहे. ही टेकडी **श्रीनगर**च्या वर हजार फूट आहे खरी; पण ती समुद्रसपाटीपासून बासष्टशें फूट उंच म्हणजे **नैनिताल** या शीतल निवासस्थानाइतकी उंच आहे.

या टेकडीचा चढ बराच बिकट आहे. कांहींकांहीं ठिकाणीं तर वाट अगदीं अरुंद असून उभ्या चढाची आहे. प्रो. **अप्रकाशचंद्र** ( हे आमच्याबरोबर आले होते. ) यांनीं "तीनचार महिन्यांपूर्वी हा सर्व रस्ता बर्फाच्छादित असून सर्व डोंगर शुभ्र दिसत असे," असें सांगितलें. त्यावरून या ठिकाणच्या ऋतुपरिवर्तनाचें आम्हांला आश्चर्य वाटलें. चढाव बिकट असल्यामुळें आम्हांला चढतांना मधून मधून विश्रांति घ्यावी लागे, आणि प्रत्येक वेळीं **श्रीनगर** व **दाल**सरोवर यांचा मनोहर देखावा जास्त चांगल्या तऱ्हेचा दृष्टीस पडे. तो दृष्टिमनोहर देखावा आमच्या चढण्याच्या श्रमाचा आम्हांला विसर पाडी. वरवर चढतां चढतां आम्ही त्या टेकडीच्या माथ्यावर आलों, तो खरा माथा अजून दूरच आहे, असें आमच्या दृष्टोत्पत्तीस आलें. या टेकडीच्या माथ्यावरून जरा खालीं उतरून पुनः वर चढावयाचें होतें; म्हणजे येथें उलट्या कमानीवजा रस्ता झाला होता. तो खोलगट भाग आम्ही लवकर चाललों, व पुनः टेकडीवर चढूं लागलों. थोड्याच वेळांत आम्ही शंकराच्या देवळाजवळ आलों. जाण्याची वाट व त्याच्या माथ्यावरील देऊळ हा सर्व देखावा कांहींसा श्रीमंत पंतप्रतिनिधींच्या **औंध** गांवाजवळील **यमाई**च्या देवळाच्या टेकडीसारखा भासतो. अर्थात **शंकरपर्वताची** टेकडी **यमाई**च्या टेकडीपेक्षां जास्त उंच आहे; पण दोहोंपैकीं एक टेकडी ज्यानें प्रथम पाहिली असेल त्याला दुसरी टेकडी पहातांना पहिल्या टेकडीची आठवण झाल्याखेरीज रहाणार नाहीं, एवढें त्यांत साम्य आहे हें खास.

शंकरपर्वतावरील शंकराचें देऊळ हिरवट, काळसर दगडाचें बांधलेलें आहे. देवळाच्या जवळजवळ गेलें म्हणजे घडीव दगडाच्या पायऱ्या लाग-

तात. देऊळ चांगल्याच स्थितींत आहे. देऊळ कांहीं फार मोठें नाहीं; पण त्याचें काम सुबक आहे. येथली शंकराची पिंडी मात्र शंकराच्या इतर पिंड्यांसारखी अगदीं लहान नाहीं; तर ती जवळ जवळ कंबरभर उंच आहे. पिंडी काळ्या दगडाची आहे.

आम्हीं देवदर्शन घेतलें, व गाभाऱ्याच्या चवथऱ्यावर क्षणभर बसलों. आम्ही देवळांत शिरलों, तेव्हां तेथें कांहींसा मद्रासी वर्णाचा व मद्रासी पोषाखाचा एक बैराग्यासारखा मनुष्य बसला होता. त्यानें आमच्या पोषाखावरून आम्ही दाक्षिणी आहोंत असें ओळखलें असावें. कारण त्यानें "आपण कोठून आलां ?" असा मराठींत आम्हांला प्रश्न केला. **श्रीनगरा**सारख्या दूरच्या प्रदेशांत आमच्या मातृभाषेंत बोलणारा मनुष्य भेटला, याबद्दल आम्हांला जरा आश्चर्य व आनंद वाटला. मग आम्ही त्या माणसाजवळ पुष्कळ चौकशी केली. त्यावरून तो मनुष्य मूळचा मद्रासी होता असें कळलें. पण त्यानें हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व तीर्थें पाहिलीं होतीं; तसेंच तो महाराष्ट्रांतहि पुष्कळ ठिकाणीं हिंडलेला होता, व म्हणूनच त्याला थोडेंफार मराठीहि येत होतें, असें दिसलें. यात्रेच्या भावनेनें कां होईना, पण हे बैरागी लोक किती तरी फिरलेले असतात, व त्यांना किती तरी भाषा येत असतात, हें पाहून आम्हांला या वर्गाबद्दल एक प्रकारचें कौतुक वाटलें.

देऊळ पाहून झाल्यावर आम्ही देवळाच्या बाहेरील तटावर आलों. येथून दिसणारा देखावा अवर्णनीय आहे, यांत शंका नाहीं. आमच्या उत्तरेस व दक्षिणेस डोंगरांच्या रांगाच रांगा दिसत होत्या, व त्यांचीं शिखरें बर्फाच्छादित असल्यामुळें तीं पांढरीं शुभ्र दिसत होतीं. या पर्वतराजींच्या मध्यें काश्मीरच्या सपाट दरीची लांबच लांब पट्टी हिरवीगार दिसत होती. आमच्या समोर **श्रीनगर** शहर, त्याच्या आसपासच्या बागा, शहरांतील हवेल्या व वाडे दिसत होते. मध्यें संथपणें **झेलम** नदी वहात होती. या नदीला **श्रीनगर**च्या वर विलक्षण वांकणें आहेत. हीं वांकणें नागाच्या चालीसारखीं नागमोडी आहेत. अशा सात नागमोडी

आम्हांला स्पष्टपणें दिसत होत्या. या विलक्षण वांकणावांकणानें जाणाऱ्या नदीची शोभा कांहीं अद्वितीय आहे. आमच्या उजव्या हाताला लंब-वर्तुलाकार डालसरोवर दिसत होतें. त्याच्या सभोंवारची झाडी व कांठच्या बागा यांनीं या सरोवराची शोभा जास्तच खुलून दिसत होती. या ठिकाणावरून सभोंवारचा नयनमनोहर देखावा आम्ही किती तरी वेळ पहात बसलों, तरी नेत्रांची तृप्ति म्हणून झाली नाहीं! पण उशीर फार होत चालल्यामुळें आम्हांला नाइलाजानें परत फिरावें लागलें.

शंकरपर्वतावरील शंकराचें देवालय फार जुनें आहे; निदान त्याचा कांहीं भाग तरी फार पुरातन आहे, असें आम्हांला सांगण्यांत आलें. हें देवालय प्रथमतः **अशोकाचा** पुत्र **जलौक** यानें इसवी सनापूर्वी २२० व्या वर्षीं बुद्धाच्या अवशेषाकरितां बांधलें होतें; पुढें सहाव्या शतकांत या देवालयाचा जीर्णोद्धार **गोपादित्य** नांवाच्या राजानें केला, असें म्हणतात. या देवळांतला जुना भाग कोणता व नवा भाग कोणता हें शोधून काढणें आतां कठीण आहे. पण एकंदर काम बरेंच जुनें दिसतें, यांत शंका नाहीं. तेव्हां तें **जलौकाच्या** वेळचेंसुद्धां असूं शकेल. असो.

शंकरपर्वताची टेकडी उतरतांना आम्ही आल्या वाटेनें परतलों नाहीं; तर शहराच्या थोडेंसें दक्षिणेच्या अंगास उतरलों, व एका उत्तम बैल-गाडीच्या सडकेला येऊन मिळालों. ही सडक चांगली खडीची केलेली असून तिच्या दोन्ही बाजूंना झाडें लावलेलीं होतीं. पैकीं बरींच झाडें चिनाराचीं होतीं. खरोखरीच या झाडांच्या पानांची कोमलता, सतेजता, सुकुमारता, झाडांची दाट सांवली व त्यांचा प्रचंडपणा विलक्षण आहे. आम्हीं वाटेनें एकदोन वेळां या झाडांचा परीघ मोजला, तो पंधरावीस फुटांवर भरला. या वृक्षांना बारीकबारीक फुलें व फळें येतात. कांहीं झाडांना फळें आलीं होतीं. फुलें तर पुष्कळांनाच आलीं होतीं. या सड-केला वॉलनट ( आक्रोडाचीं ) झाडेंहि पुष्कळ आहेत. हें झाडहि मोठें वाढतें, व दिसण्यांत सुबक दिसतें. या सर्व सडकेच्या बाजूला व सडकेच्या पलीकडील भागांत 'वुइलो' ( वाळुंजी ) या नांवाचीं झाडेंहि फार आहेत.

दुरून हीं झाडें कांहींशीं आपल्या इकडील बांबूंच्या झाडांसारखीं दिसतात. मात्र बांबू फार जाड वाढत नाहीं, खूब उंच होतो; पण वुइलोचीं झाडें बरींच जाड वाढतात, त्यांना फांद्या असतात व तीं बांबूसारखीं फार उंच वाढत नाहींत. वाटेनें आम्हांला या झाडांच्या राईच्या राई लागल्या. तसेंच या भागाला तुतीचीं झाडेंहि बरींच आहेत. दुसरींहि पुष्कळ झाडें आम्हांला वाटेनें लागलीं. पण त्यांची माहिती प्रो. अप्रकाशचंद्र बाबूं-नाहि नव्हती. तेव्हां आम्हांला ते काय माहिती देणार ? पण इकडील सर्वच झाडें आपणाला अपरिचित असतात, हें मात्र खरें.

आम्हांला **पनरतन** नांवाच्या देवळाला जावयाचें होतें. आम्ही सारखे पुढें चाललों होतों. आमच्या उजव्या हाताला **झेलमनदी** वहात होती. ती केव्हां आमच्या जवळ येई तर केव्हां दूर जाई. डाव्या बाजूला **शंकरपर्वताच्या** टेकडीची मागली बाजू लागलेली होती. पुढें जातांजातां आम्ही एका खेडेगांवाजवळ आलों. या ठिकाणीं नदी व पर्वत हीं अगदीं एकमेकांजवळ आलीं होतीं, व या दोहोंच्या सांधींत तें गांव वसलेलें दिसत होतें. आम्ही तें देऊळ टाकून पुढें आलों असूं, अशी आम्हांला शंका आली, म्हणून आम्ही एका वाटसरूला विचारलें. "तुम्ही फार पुढें आलां." असें त्यानें आम्हांला सांगितलें. तेव्हां आम्ही परत फिरलों व त्यानें सांगितलेल्या रस्त्यानें चाललों. हा रस्ता म्हणजे पाऊल-वाट असून ती वुइलो झाडांच्या राईंतून जात होती.

थोड्याच वेळांत आम्ही आमच्या इष्ट स्थलीं आलों, असें आम्हांला वाटलें. कारण, एक पडकें लहानसें देऊळ आम्हांला दिसूं लागलें. तें पाहून इतका त्रास करून कशाला येथें आलों असें आम्हांला प्रथम वाटलें. हें देऊळ फारच लहान आहे. याच्या चौथऱ्याची एक बाजू अवघी अठरा फूट आहे. देवळासभोंवतीं पूर्वीं तलाव असावा; पण आतां तो बहुतेक ओहरला आहे. देवळांत अजूनहि थोडें पाणी आहे. हें देऊ-ळहि हिरवट, निळसर रंगाच्या दगडाचें आहे. देवळाच्या चारहि बाजूंना कमानींचे दरवाजे असून कमानी चौकोनी दगडांच्या केलेल्या आहेत.



नं. ९ शंकर पर्वत शिखरावरील देवालय पान ४२



नं. १०　　पनरतन देवालय　　पान ४३

देवळावर लहानसा घुमट आहे. घुमटाचें छत सर्व दगडाचेंच आहे. या देवळावर जिकडे तिकडे घडीव मूर्ति असून त्या उत्तम मूर्तिकलेची साक्ष पटवतात. देऊळ आंतून पाहिल्यावर तेथें गेल्याबद्दल आम्हांला वाईट वाटलें नाहीं. उलट हें देऊळ पाहिलें नसतें तर काश्मीरांतील जुन्या देवळांची तितकी चांगली कल्पना आम्हांला आली नसती, असेंच आम्हांला वाटलें. हें देऊळ बरेंच पडकें दिसतें. आसपास तलाव ओहोळ- ल्यामुळें येथें वाणहि बरीच सांचली आहे.

या देवळाचें मूळ नांव 'पुराण आदिस्थान' असें असून 'पनरतन' हा त्याचाच अपभ्रंश आहे असें आम्हांला सांगण्यांत आलें. जुनें श्री- नगर शहर याच बाजूला होतें. पण तें शहर जळलें व तलावामुळेंच हें देऊळ शाबूत राहिलें, असें सांगतात. हें देऊळ **पार्थ** या नांवाच्या काश्मीरच्या राजाच्या कारकीर्दींत त्याचा प्रधान **मेरु** यानें सन ९१३ ते ९२१ च्या दरम्यान बांधलें असावें, असें म्हणतात.

हें देऊळ पाहून होतें, तों बाराचा सुमार झाला; म्हणून आम्ही बिऱ्हाडीं परत आलों, व जेवणखाण करून तीन वाजेपर्यंत विश्रांति घेतली. नंतर प्रो. **अप्रकाशचंद्र मेहेता** आपलें कॉलेजांतील काम संप- वून परत आल्यावर ते व आम्ही **चष्मशाही** नांवाची बाग व प्रख्यात झरा पहाण्याकरितां बिऱ्हाडांतून बाहेर पडलों.

आमच्या बिऱ्हाडापासून कालवा पांच मिनिटांच्याच रस्त्यावर होता. तेथें जाऊन, **चष्मशाई** या बागेपर्यंत दाल सरोवरांतून जाऊन परत यावयाच्या करारानें एक शिकारा आम्हीं ठरविला, व त्यांत आसनस्थ झालों. बसावयाला गाद्या होत्या. ऊन लागूं नये म्हणून वर लहानसें छप्पर व बाजूनीं पडदे सोडण्याची व्यवस्था केलेली होती. कांहीं वेळ कालव्यांतून गेल्यावर आम्ही दाल सरोवराच्या दरवाज्यापाशीं आलों. येथें पाण्याला ओढ फार असते. होड्या जातांयेतांना उलटचापालटच्या होऊं नयेत, विशेषतः प्रवाहाच्या उलट वल्हवतांना मदत व्हावी म्हणून दरवाज्याच्या दोन्ही बाजूंना साखळदंड सोडले आहेत. या सांखळ-

दंडाला धरून होडी दाल सरोवरांत आली. दाल सरोवराचें पाणी फार निर्मळ असून तें नीळसर रंगाचें आहे. झेलमचें व तिच्या कालव्याचें पाणी गढूळ असून धूसर रंगाचें आहे. यामुळें येथल्या या दोन पाण्यांचा भेद प्रयाग येथील गंगा-यमुना या नद्यांच्या पाण्याच्या भेदासारखा भासतो. तलावाचें पाणी अगदीं शांत आहे. तलाव आठ दहा फूटच खोल आहे; पण पाण्याच्या स्वच्छतेमुळें खालचा तळ स्पष्टपणें दिसतो. या तलावांत जिकडेतिकडे पाणवेली, पाणझाडें, कमळें, लव्हाळे, शिंगाडे, शेवाळ वगैरे उगवलेलीं आहेत. आम्ही शिकाऱ्यांतून जात असतां ' गग्रीबल ' या नांवाच्या सरोवराच्या टोंकावरून गेलों. येथला देखावा अद्वितीय आहे. येथें कांठाला प्रचंड खडक आहेत व मधून मधून एखादंदुसरें झाड आहे. खडकाला काळा, तांबूस, हिरवट असे निरनिराळे रंग आहेत व खडक एकावर एक असे विलक्षण तऱ्हेनें चिकटलेले आहेत. येथून सरोवराचा देखावा चांगलाच दिसतो.

या सरोवरांत लहानलहान बेटें आहेत. एका बेटावर काश्मीरच्या महाराजांच्या गुरूकरितां एक स्वतंत्र बंगला बांधला आहे. त्याच्या कांठानें आमचा शिकारा चालला होता. या तलावाच्या बाजूबाजूंना तरत्या बागा केलेल्या आहेत. अशा बागा तर आम्हीं आजन्मांत पाहिल्या नव्हत्या ! तलावाच्या उथळ भागावर लव्हाळे, लांब पसरणाऱ्या वेली वगैरेंच्या जुड्या आंथरतात, त्यांवर गवत पसरतात, व मग त्यावर माती पसरून त्यांत कलिंगडें, कांकड्या यांच्या वेली व लहानलहान फुलझाडें लावतात. सरोवराचें पाणी अत्यंत संथ असल्यामुळें अशा बागा येथें होऊं शकतात. यांपासून चांगलें उत्पन्नहि होतें, असें समजलें.

आधींच त्या सरोवराचें शांत, स्फटिकवत् नीळसर पाणी; त्यांत तीं वेलींचीं सतेज पानें व फुलें; सभोंवार हिमालय पर्वताच्या रांगांचा तो तट व त्याची सरोवरांत पडणारी पडच्छाया; सरोवराच्या किनाऱ्यावरील तीं चिनार, सफेता, तुती वगैरे झाडें; हा सर्व देखावा केवळ अननुभूतपूर्व वाटतो, यांत शंका नाहीं.

सुमारें तासा सवा तासानें आम्ही **डाल** सरोवराच्या किनाऱ्यावर उतरलों, व तेथून **चष्मशाई** या बागेंत गेलों. **शालीमार** किंवा **निषातबाग** इतकी ही बाग मोठी नाहीं. बागेंत गेल्यावर उजव्या हाताला एक अगदीं अर्वाचीन तऱ्हेचा बंगला लागला. पण तो कशाकरितां बांधला आहे, हें आम्हांला तेव्हां कळलें नाहीं. तो बंगला टाकून आम्ही आंत गेलों. या बागेला तीनच मजगी असून **शालीमार**प्रमाणें कालवे, धबधबे व कारंजींहि आहेत; पण तीं फारशा मोठ्या प्रमाणांत नाहींत. **शालीमार**इतकी ही बाग चांगल्या स्थितींत ठेवलेली नाहीं; यामुळें **मृच्छकटिकांत** वर्णिलेल्याप्रमाणें ती **जीर्ण शुष्कवाटिका** भासते. या बागेंत दोन चार तंबू दृष्टीला पडले. यावरून येथें वाटसरू येऊन उतरत असावे, असें आम्हांला वाटलें. पण बागेची प्रसिद्धि **शालीमार** किंवा **निषात-बाग** याप्रमाणें पुष्पवाटिका किंवा कृत्रिम कारंजीं यांकरितां नसून तेथील स्वाभाविक झऱ्याकरितां आहे. **चष्मशाई** याचा शब्दार्थ मुळीं **बादशाही झरा** असा आहे.

शेवटीं, एकदांचे आम्ही त्या झऱ्याजवळ येऊन पोहोंचलों. या झऱ्याच्या तीनहि बाजूंना दुमजली लांकडी इमारत असून खालच्या मजल्यांत तीन बाजूंना बसण्यास ओटे केलेले आहेत. झऱ्याचें पाणी चांगलें मांडीभर उंच उडत होतें. सरासरी चार इंची तोटींतून जोरानें पाणी आलें असतां जितकें येईल, तितका हा झरा होता, असें वाटलें. या झऱ्याला चांगलें दगडी कुंड बांधलें असून झऱ्याच्या तोंडावर ठेवण्याकरितां एक जस्ताचें नळकांडें ठेवलेलें आहे. यामुळें त्या नळकांड्यांतून पाणी येऊन तें वर्तुलाकार खालीं कुंडांत पडे. या झऱ्याचें पाणी इतकें निर्मळ व शुभ्र आहे कीं, वर्तुलाकार पडणारें तें पाणी दुरून कांचेच्या हंडीसारखें हुबेहुब दिसलें. पाणी हातांत घेतल्याबरोबर बर्फासारखें गार वाटलें. इतक्या शुभ्र, गार व निर्मळ पाण्याचा असा झरा दुर्मिळच आहे, यांत शंका नाहीं. तेव्हां 'झऱ्याचा राजा' हें नांव त्याला अन्वर्थक आहे, असें माझ्या मनांत आलें. पेशावरास अशा निर्मळ पाण्याची एक विहिर

आम्हीं पाहिली होती खरी, पण त्या विहिरीचें पाणी इतक्या जोरानें वर उडत नसे. झऱ्याचा देखावा अदृष्टपूर्वच खरा, असें आम्हांला वाटलें. कारण, अशी परिस्थिति दुसऱ्या ठिकाणीं नाहीं. ज्या ठिकाणीं हा झरा आहे, त्याला लागून गर्द छायेनें आच्छादित असा एक डोंगर आहे, व त्याच्या पलीकडे बर्फाच्छादित डोंगरच सारखे लागत गेले आहेत. तेथलें बर्फ वितळतें, त्यामुळेंच या झऱ्याला पाण्याचा पुरवठा होतो. अर्थात् या झऱ्याचें पाणी बर्फासारखें निर्मळ व गार असतें यांत नवल नाहीं. या सुंदर झऱ्याचें पाणी पिण्याची आम्हांला इच्छा झाली; पण आमच्या-जवळ भांडें नव्हतें. तेव्हां आम्ही ओंजळीनेंच पाणी पिऊं लागलों; इतक्यांत तेथें एक गृहस्थ बसले होते, त्यांनीं एक पाणी पिण्याचा ग्लास आम्हांला दिला, व आमची विचारपूसहि केली. आम्ही त्या भांड्यानें तें पाणी प्यालों. त्याच्या स्वच्छतेप्रमाणें व गारपणाप्रमाणें तें पाणी प्यावयाला फार गोडहि होतें. यामुळें हें खरोखरीं अमृतच आहे कीं काय, असा आम्हांला भास झाला. पाणी प्याल्यावर आम्ही त्या गृहस्थाशीं आमच्या मोडक्यातोडक्या हिंदींत बोलूं लागलों; पण त्यांना इंग्रजी येत आहे, असें आम्हांला कळलें. अर्थात् आमची भाषेची अडचण दूर झाली. ते गृहस्थ कानपुरचे रहाणारे होते. त्यांनीं सांगितलें " मला नित्याजीर्णाचा विकार झाला होता, व त्यावर पुष्कळ उपाय केले; पण कांहीं एक गुण आला नाहीं. शेवटीं एका स्नेह्याच्या सांगण्यावरून मी **श्रीनगरांत** येऊन या **चष्मशाई** बागेंत राहिलों. येथल्या हवेनें, व विशेषत: या झऱ्याच्या पाण्यानें माझा रोग पार नाहींसा झाला. व तेव्हांपासून मी दरवर्षीं या ठिकाणीं येऊन एक पंधरवडा तरी बागेंत घालविल्याशिवाय रहात नाहीं. एक अमेरिकन प्रवासी येथें आला होता, त्यानें मला सांगितलें, कीं, सर्व जगांत असें पाचक पाणी आपण पाहिलें नाहीं ! "

त्या गृहस्थांच्या या सांगण्यांत थोडाफार अतिशयोक्तीचा भाग असेल, असें आम्हांला वाटलें; तरी पण त्या झऱ्याचें पाणी म्हणजे एक विलक्षण चीज आहे, यांत शंका नाहीं. या झऱ्याच्या पाण्याची ही महती

एकून मला पुरंदर किल्ल्यांतील एका विहिरीच्या पाण्याच्या हितावहपणाबद्दल अशीच एक गोष्ट ऐकल्याची आठवण झाली.

या झऱ्याशीं आम्ही किती वेळ तरी बसलों होतों. आतां परत फिरणार, इतक्यांत ते गृहस्थ म्हणाले, “काश्मिरच्या महाराजांचे गुरु याच बागेंत त्यांच्याकरितां स्वतंत्र बांधलेल्या बंगल्यांत रहातात. कधींकधीं ते डालसरोवरांतील बेटावरील बंगल्यांतहि रहातात. पण आज ते चष्मशाईच्याच बंगल्यांत आहेत. त्यांची व आपली मी भेट करवितों.”

त्या गृहस्थांच्या या सौजन्याबद्दल व मदतीबद्दल आम्हीं त्यांचे आभार मानले, व त्यांच्या मागोमाग चाललों. थोड्याच अवकाशांत आम्ही त्या नव्या बंगल्याशीं आलों. प्रथमतः बागेंत शिरतांना हाच बंगला आमच्या दृष्टीला पडला होता. त्याचा आतां उलगडा झाला.

आम्ही बंगल्यांत शिरलों, तों तो मुंबईच्या एखाद्या श्रीमंत भाट्याच्या बंगल्याप्रमाणें उत्तम तऱ्हेनें शृंगारलेला दिसला. आंत जिकडे तिकडे गालिचे, हंड्या, झुंबरें होतीं. शेवटीं, आम्ही एका उत्तम शृंगारलेल्या दिवाणखान्यांत आलों, तोंच एक तेजःपुंज, गोरीगोरीपान भव्य मूर्ति आमच्या दृष्टीला पडली. हेच ते गुरु असावे, असा आम्हीं तर्क केला. आमच्याबरोबर आलेल्या गृहस्थांनीं आमची त्यांच्याशीं ओळख करून दिली. गुरुमहाराज एका चांगल्या गालिचावर विराजमान झाले होते. त्यांनीं इंग्रजी तऱ्हेनें कातरलेले केंस ठेवले होते; अंगांत तालीमबाजी सदरा होता; व नेसावयाला रेशीमकांठी धोतर होतें. गुरुमहाराज अर्थात्‌च हुक्का पीत असत. त्यांचा हुक्काहि राजगुरूच्या दर्जाला साजेसा रुप्याच्या मुठीचा होता. मधून मधून ते हुक्का ओढीत असत. त्यांना हिंदी चांगलें येत होतें; पण आम्हांला मात्र मोडकेंतोडकें येत होतें; यामुळें आमचें संभाषण बेताबातानेंच चाललें होतें; तरी पण हे गुरुमहाराज काश्मीरच्या महाराजांबरोबर बहुतेक सर्व हिंदुस्थान पाहून आलेले असून पुण्यामुंबईलाहि ते पुष्कळ दिवस राहिलेले आहेत, असें आम्हांला समजलें. आम्ही पुण्या-

कडचे आहांत, असें जाणून त्यांनीं आमचें आदरातिथ्य चांगलें केलें. गुरुमहाराजांकडे नेहमीं फळांचीं पार्सलें येत असावीं, असें दिसलें. त्यांपैकीं **चेरी** नांवाच्या फळांनीं भरलेली टोपली त्यांनीं आम्हांपुढें केली, व आम्हांला ती खाण्याचा फार आग्रह केला. अर्थात् आम्हांलाहि त्यांच्या म्हणण्याला रुकार देणें भाग पडलें. इतक्यांत काश्मीरांतील एक बडे गृहस्थ आल्याची वर्दी आली. त्या गृहस्थांनीं आंत येऊन स्वामिमहाराजां-च्या पायांवर डोकें ठेविलें. स्वामिमहाराज व ते गृहस्थ यांचें थोडा वेळ भाषण झालें. ही संधि आपणांला जावयाला बरी आहे, असें पाहून आम्ही जाऊं लागलों; पण स्वामिमहाराजांनीं आम्हांला थांबण्याचा आग्रह केला. अर्थात् आम्हांलाहि रहाणें भागच पडलें.

ते गृहस्थ गेल्यावर गुरुमहाराज आमच्याजवळ आणखी कांहीं विषयां-वर बोलले; त्यांत त्यांनीं आम्हांला दोनतीन मजेच्या गोष्टी सांगितल्या. एकंदरींत गुरुमहाराज बरेच धोरणी, बहुश्रुत व व्यवहारदक्ष दिसले. त्यांची संभाषणशैली चांगली वाखाणण्यासारखी होती. यावरून काश्मीरच्या महाराजसाहेबांवर या गुरूची छाप कां व कशी बसली असेल याची आम्हांला चांगली कल्पना आली. या गुरुमहाराजांजवळ आमचे दोन अडीच तास गेले. अगदीं सायंकाळ होऊन गेल्यामुळें आम्हांला तांतडीनें परत जावें लागलें, म्हणून या **चष्मशाई**बागेजवळच असलेली '**परी-महाल**' नांवाची जुनी इमारत पहाणें आम्हांला शक्य झालें नाहीं. ही इमारत **चष्मशाई**पासून चांगली दिसत होती. ती एका उंच पर्वताच्या बाजूवर असून तिच्या कमानीकमानींची रांगचीरांग स्पष्ट दिसत होती. ही इमारत **शहाजहान**चा मुलगा **दाराशुक** यानें आपला गुरु **मुल्लाशहा** याचेसाठीं ज्योतिषाचे वेध घेण्याकारितां बांधली होती, असें म्हणतात. ही इमारत पहावयाला सांपडली नाहीं, म्हणून मला जरा वाईट वाटलें; पण या बाबतींत आमचा नाइलाज होता, म्हणून आम्हांला तसेंच परतावें लागलें.

परत येतांना आम्ही **दाल** सरोवरांत जरा चक्कर मारून आलों, व त्या सरोवरांतील **रूपलंका** नांवाचें बेट पाहिलें. हल्लीं येथें दोनचार चिनाराचीं झाडें आहेत; पण पूर्वीं येथें चांगला वाडा होता, असें म्हणतात. या बेटावर जाऊन आम्ही क्षणभर सभोंवारची शोभा पहात होतों. आतां सायंकाळ होत असल्यामुळें दाल सरोवराची निराळीच शोभा दिसूं लागली होती. थोड्या वेळानें आम्ही पुनः शिकाऱ्यांत बसलों, व परत दाल सरोवरांतून कालव्यानें परतलों. धक्क्यावर आल्यावर शिकारावाल्याला जास्त वेळ खोटी झाल्याबद्दल थोडे जास्त पैसे दिले, व आम्ही मोठ्या आनंदित मनानें बिऱ्हाडीं आलों. दाल सरोवराचा देखावा व **चष्मशाई**ची अपूर्वता हीं सारखीं आमच्या डोळ्यांपुढें उभीं रहात होतीं.

**ता. २८ मे**—आज सकाळीं आम्ही विश्रांतिच घेतली म्हणाना! कारण, आम्ही बिजलीबाबूंच्या बिऱ्हाडाहून प्रो. अप्रकाशचंद्र मेहेता यांजकडे आल्यापासून त्यांना भेटलों नव्हतों; म्हणून सकाळीं आम्ही त्यांच्याकडे गेलों, व पुढील कार्यक्रम ठरविला. आमच्या बिऱ्हाडाशेजारींच शाळांचे इन्स्पेक्टर रहात असत. त्यांचा व काश्मीरांत एका वेळीं असलेल्या माझ्या नातेवाईकाचा फार स्नेह झाला होता, म्हणून त्यांच्याकडेही आम्ही भेटण्यास गेलों. त्यांनीं पुढील दोन दिवसांत आम्हांला कायकाय पहातां येईल, याची बरोबर माहिती दिली, व त्यांच्या बेताप्रमाणें दुसऱ्या दिवशींच **श्रीनगरा**पासून दूरचीं प्रेक्षणीय स्थळें पहावयास निघण्याचा आम्हीं निश्चय केला. याप्रमाणें सकाळची वेळ इकडे तिकडेच निघून गेली. तेव्हां जेवण झाल्यावर आम्ही **श्रीनगर**चा अजबखाना पहावयास गेलों.

हा अजबखाना **लालमंडी** नांवाच्या हल्लींच्या पूर्वींच्या महाराजांनीं बांधलेल्या अतिथिगृहामध्यें आहे. ही इमारत लांकडीच असून तिला मारवाडी तऱ्हेचा तांबडा, हिरवा, निळा असा दाट रंग दिलेला आहे. यामुळें इमारत फारशी मनांत भरत नाहीं; पण त्याचा वचपा लालमंडीच्या पुढील बागेनें मात्र भरून काढला आहे, यांत शंका नाहीं. या

बागेंत गुलाबच गुलाब आहेत! कमानदार सांखळदंडाच्या व लोखंडी खांबांच्या कुंपणावर गुलाबांच्या वेली लावलेल्या आहेत. या वेली फुलांनीं फुललेल्या होत्या. त्यांत शिरतांना एक कमान केली आहे, त्यावरही गुलाब-वेली सोडल्या आहेत. पायवाटेच्या दुतर्फा गुलाबांचें कुंपण आहे, व शिवाय कुंड्यांतहि निरनिराळ्या रंगांच्या फुलांचे गुलाब आहेत. यामुळें या इमारतीची पुढील बाजू फारच चित्ताकर्षक झाली आहे. नेहमींच्या जिनसांनीं अजबखाना भरलेला आहे. तेथें जुनीं नाणीं आहेत; जुनीं हत्यारें आहेत; जुन्या मूर्ति आहेत; शिल्पकलेचे मासले आहेत; काश्मीर-च्या विशेष कारागिरीचे नमुने आहेत; त्यांतल्या त्यांत काश्मीरच्या शालींचा मोठा संग्रह आहे. येथें आम्ही दोनशें रुपयांपासून हजार बाराशें रुपयांपर्यंतच्या शाली पाहिल्या. शालींतील नक्षीचें काम वाखाणण्यासारखें आहे. एका शालीमध्यें श्रीनगर शहराचा सबंध नकाशाचा नकाशा नक्षीनें काढलेला आम्हीं पाहिला. ती शाल पाहून आम्हांला या कारागिरीचें आश्चर्य वाटलें. पण या कलेला हल्लीं पूर्वींसारखा आश्रय नसल्यामुळें ती बुडण्याच्या पंथाला लागत चालली आहे, हें ऐकून वाईटहि वाटलें.

अजबखाना पाहून झाल्यावर आम्ही श्रीनगर येथील प्रताप कॉलेज पहावयाला गेलों. तेथें प्रो. अप्रकाशचंद्र बाबूंनीं इतर प्रोफेसर व प्रिन्सिपॉल यांच्याशीं आमची ओळख करून दिली. प्रोफेसरमंडळींत प्रांतो-प्रांतींचे लोक होते. हें पाहून हल्लीं उद्योगाकरितां सुशिक्षित मंडळी किती दूरदूर जातात, हें आमच्या लक्ष्यांत आलें. हें कॉलेज प्रथमतः **आनी बिझांट** बाईच्या थिऑसाफिकल सोसायटीनें काढलें, व तें त्यांनीं आठ-दहा वर्षें चालविलें. पुढें जेव्हां काश्मीर संस्थानांत संस्थानचें कॉलेज काढ-ण्याचें ठरलें, तेव्हां थिऑसाफिकल सोसायटीनें सामानसुमान, जागा, इमारती, पुस्तकें व उपकरणें यांसुद्धां सर्व कॉलेज संस्थानच्या हवालीं केलें. कॉलेज फारसें मोठें नाहीं. कारण या संस्थानांत अजून शिक्षणाचा फारसा प्रसार झाला नाहीं. तरी पण इमारती बऱ्यापैकीं आहेत, व सभों-वार पुष्कळ मोकळी जागाही आहे.

प्रो. अप्रकाशचंद्र बाबूंचें कॉलेजांतलें काम संपल्यामुळें तेही आमच्या बरोबरच बिऱ्हाडीं आले. मग आम्ही शिकाऱ्यांत बसून झेलमनदींतून फेरफटका केला व 'पेपरमॅची' नांवाच्या एकदोन कारखान्यांत गेलों. श्रीनगरांत हा एक मोठा धंदा आहे. लांकडी सामानावर निरनिराळ्या नक्षीचे कागद चिकटवून हें सामान केलें जातें. आम्ही एका मोठ्या दुकानीं गेलों, व तेथें सर्व तऱ्हेचें सामान पाहिलें. खुर्च्या, टेबलें, मेजें, कपाटें, शेल्फें, पेट्या, आलमायरें, खुंट्या, कलमदानें, कागद ठेवण्याच्या पेपररॅक्स अशा व्यवहारांत लागणाऱ्या किती तरी वस्तूंचे मासले आम्हीं पाहिले. त्याचप्रमाणें मुलांचीं निरनिराळीं खेळणींहि आम्हीं तेथें पाहिलीं. येथें पेपरमॅचीचें काम फार सुबक करण्यांत येतें, यांत शंका नाहीं. लांकडावरच नक्षी काढली आहे असा भास होतो, इतकें कागद चिकटवण्याचें काम बेमालूम केलेलें असतें.

याप्रमाणें एकदोन दुकानें पाहून आम्ही नदीच्या मार्गानेंच परत आलों. श्रीनगरांतील घरें नदीकडे तोंड करून बांधलेलीं आहेत. यामुळें नदीमधून नावेंतून जातांना विविध प्रकारची शोभा दिसते. काशीस किंवा मथुरेस होडीमधून गेलें म्हणजे जसा देखावा दिसतो, त्याच तऱ्हेचा येथेंही दिसतो.

आज सायंकाळीं आम्ही रेसिडेन्सीच्या पलीकडे लांबपर्यंत सहल करीत गेलों. श्रीनगरांत झेलम नदीचें पाणी येऊं नये म्हणून नदीच्या दोन्ही बाजूंना उंच उंच बंधारे घातले आहेत, व या बंधाऱ्यांवरून सुंदर रस्ता केला आहे. याच रस्त्यानें आम्ही तीन साडेतीन मैल म्हणजे शहराच्या वस्तीच्या पलीकडे सहल करीत गेलों. शहराच्या वर नदीचें फाजील पाणी दूर नेण्याकरितां नदीला कालवा काढला आहे. त्या कालव्याच्या दरवाज्यापर्यंत आम्ही चालत गेलों. यामुळें शहराची व नदीची अशी दुहेरी शोभा आम्हाला पहावयाला सांपडली. नदींत जागोजाग नौकागृहें लागत असत; या नौका निरनिराळ्या आकाराच्या व सर्व सुखसोयींनीं युक्त असतात. या हजारों नौका पाहिल्या म्हणजे असें वाटतें कीं, श्रीनगर शहराचे दोन भाग असून एक जमिनीवर स्थिर आहे, तर दुसरा पाण्यावर तरंगत आहे. या वाटेनें चालतांना आम्हाला युरोपियन क्लब, त्यांचीं मोठमोठीं दुकानें, त्यांच्या खेळावयाच्या जागा वगैरे सर्व पहावयाला सांपडलें. रात्र झाल्यावर आम्ही बिऱ्हाडीं परतलों.

---

# प्रकरण ४ थें



## वितस्तेच्या उगमाशीं

तारीख २९ मे–ज्या झेलमनदीचें ( वेदांतील वितस्तेचें ) प्रथम दर्शन झेलम स्टेशनवर होतें, काश्मीरला जातांना मरी हें शीतल निवासस्थान सोडल्यावर थोड्याच वेळानें जी नदी अगदीं पाताळांत गेल्यासारखी उजवीकडे दिसूं लागते, कोहाला या गांवीं जिच्या पलावरून पलीकडे रस्ता जातो, व जी मग रस्त्याच्या डाव्या बाजूला रहाते, जी नदी सुमारें सवाशें मैलपर्यंत आपल्या डाव्याउजव्या हातांला पण नजीक असल्यामुळें आपणाला सतत दर्शन देत असते, जी कधीं शांत व गंभीर तर कधीं खळखळणारी व भीषणस्वरूप, कधीं रुंद पात्रांतन जाणारी तर कधीं अगदीं डोंगराच्या फटींतून वाहणारी, कधीं संथ तर कधीं वेगवती अशी बहुरूपी आहे, त्या वितस्तेच्या थेट उगमाशीं आज आपण जाणार म्हणून माझें मन फार उल्लासित झालें होतें.

नेहमींप्रमाणें आम्ही टांग्यांतून पहांटेला साडेपांच वाजतां निघालों. आमचा रस्ता साधारण दक्षिणेकडे जात होता. पहिले तीनचार मैल आमच्या ओळखीचेच होते. पुढें आम्हांला पॅम्पपुर ( पद्मपुर ) गांव लागलें. येथें केशराच्या बागा पुष्कळ आहेत, असें समजलें. आमचा रस्ता अगदीं सपाटीवरून चालला होता. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना निरनिराळीं सुंदर झाडें लावलेलीं होतीं. कोठें चिनार तर कोठें पॉपलर, कोठं तुती तर कोठं वुइलो अशीं नाना तऱ्हेचीं झाडें दुतर्फा लागतात. त्यांच्या पलीकडे हिरवींगार शेतें लागतात. उजवीकडे नदी सारखी सोबतीला असतेच. पलीकडे डोंगरांच्या रांगाचरांगा दिसतात. या सर्व नयनमनोहर देखाव्यानें वाटेचा कंटाळा बिलकूल येत नाहीं. शिवाय, रस्ता चांगला व सपाट असल्यामुळें टांगाहि वेगानें जातो.

सुमारें अडीच तास चालल्यावर आम्ही **अवंतिपुर** या गांवीं आलों. हें गांव म्हणजे अगदीं लहानसें खेडें आहे. पण पूर्वकालीं हें एक राजधानीचें शहर होतें. हें शहर **अवंतिवर्मा** नांवाच्या काश्मीरच्या राजानें सन ८५२ ते ८८३ पर्यंतच्या आपल्या कारकीर्दींत वसविलें; परंतु दोन जुन्या देवळांखेरीज या मोठ्या शहरापैकीं हल्लीं कांहींच शिल्लक नाहीं. मात्र जिकडेतिकडे जुन्या इमारतींच्या खुणा दृग्गोचर होतात. हीं दोन देवळेंहि मातींत पुरून गेलेलां होतीं. पण पुढें तीं उकरण्यांत आलीं. आणि सर्व इमारतींचे भाग मोकळे करण्याचें काम आम्ही **अवंतिपुराला** गेलों तेव्हांसुद्धां चालूच होतें. या दोन देवळांची बांधणी एक प्रकारचीच आहे. मात्र एक देऊळ दुसऱ्यापेक्षां फार मोठं आहे. मुख्य देव्हारा किंवा गाभारा मधोमध असून सभोंवार सारखी चौकोनी इमारत बांधलेली आहे. यामुळें हीं दोन्ही देवळें फार प्रेक्षणीय दिसतात. दगड हिरवट काळसर आहे. मुख्य दरवाजावर फार नक्षीचें काम केलेलें आहे, व सभोंवार ओऱ्यांसारखें बांधकाम आहे, तेंहि सुबक आहे. पण हीं दोन्ही देवळें फार पडीत स्थितींत आहेत. हवेमुळें दगड फार खराब झाले आहेत; परंतु ज्या वेळीं हीं देवळें नवीं कोरीं असतील, त्या वेळची त्यांची शोभा कांहीं विलक्षणच असली पाहिजे, असें वाटल्यावांचून रहात नाहीं. लहान देऊळ आधीं बांधलेलें आहे व मोठें देऊळ मागाहून बांधलेलें आहे. दोन्ही देवळें महादेवाचींच आहेत. एकाचें नांव '**अवंतीश्वर**' व दुसऱ्याचें नांव '**अवंतीस्वामी**' असें आहे. या देवळांवरून काश्मीरांत मूर्तिकला व वास्तुकला यांची एका काळीं किती प्रगति झाली होती, याची अटकळ उत्तम बांधतां येते.

हीं दोन्ही देवळें पाहून झाल्यावर आम्ही पुढें मार्गस्थ झालों, ते **अनंतनाग** या गांवीं सुमारें ५ तासांनीं म्हणजे साडेदहांच्या सुमाराला येऊन पोहोंचलों; अर्थात् आमच्या टांग्याचा वेग खोळंबा धरून दरताशीं ७ मैल पडला. हा वेग आमच्या इकडच्या टांग्यांच्या मानानें पुष्कळच जास्त

आहे यांत शंका नाहीं. याचें कारण उत्तम सपाट रस्ता व थंड हवा हें होय. यामुळें घोडे दमत नाहींत, व त्यांना जलद चालतांहि येतें. असो.

**अनंतनाग** हें या शहराचें हिंदु नांव आहे. याचें मुसलमानी नांव **इसलामाबाद** असें आहे. काश्मीरसंस्थानांत हें शहर श्रीनगरच्या खालोखाल आहे. येथें सुमारें वीस हजार वसती आहे, व तींपैकीं पुष्कळ मुसलमानी धर्माचीच आहे, हें उघड आहे. **श्रीनगर**राहून आम्हीं एका शाळामास्तरांना पत्र घेतलें होतें, म्हणून आम्ही शाळेचा शोध करीत गेलों. शाळा सकाळची होती. यामुळें मास्तर शाळेंत भेटले. शाळा सुटावयाची वेळ झाली असल्यामुळें ते आमच्याबरोबर निघाले, व त्यांनीं आम्हांला आपल्या बिऱ्हाडीं नेलें. आमची जेवणाखाणाची व्यवस्था उत्तम झाली. आम्ही स्नानाकरितां या ठिकाणच्या मुख्य झऱ्याकडे गेलों. या ठिकाणाला तिकडील हिंदुलोक तीर्थ मानतात; यामुळें त्या ठिकाणीं आम्हांला तीर्थोपाध्याय दृष्टीला पडले, व ते आपल्या चोपड्या काढून पाहूं लागले. आम्हांला तीर्थविधि करावयाचा नव्हता. म्हणून आम्ही घुसळखान्यांत ( झऱ्याजवळ आडोशाचें स्नानगृह ) स्नान केलें. या झऱ्याच्या ठिकाणीं सुमारें ४० फूट औरसचौरस असें कुंड बांधलेलें आहे. तें तीनचार फूटच खोल व जमिनीपासून फूट दीड फूट उंच आहे. या झऱ्याच्या पाठीशींच मोठा डोंगर असून त्या डोंगराखालून झरा वहात आहे. या झऱ्याचें पाणी कुंडांत घेतलेलें असून कुंड सारखें एका बाजूनें वहात आहे. सुमारें चाळीस फूट लांबीच्या कुंडाच्या एका बाजूवरून पाणी वहातें. कुंडांतील पाणी डालसरोवराप्रमाणें हिरवट निळसर असून त्यांत पुष्कळ मोठमोठे निळे मासे आहेत. पाणी अगदीं निर्मळ असल्यामुळें कुंडाचा तळ व तेथले दगड व रेती स्पष्टपणें दिसतात. एवढा मोठा पाण्याचा प्रवाह धो धो वहातांना आपल्याकडे क्वचितच दृष्टीला पडतो. यामुळें हें ठिकाण आश्चर्यकारक भासतें. येथें पूर्वी चांगली बाग होती; पण आतां तिचा कांहींएक मागमूस आम्हांला दिसला नाहीं.



नं. १२ दाल सरोवर पान ५४



नं. ११ अवंतीश्वराचें देवालय व आवार पान ५३

येथून जवळच एक गार गंधकाचा झरा आहे तो पहावयाला आम्ही गेलों; तेथेंहि लहानसें कुंड केलेलें दिसलें. या गांवांत जिकडेतिकडे स्वच्छ आणि गार पाण्याचे झरे आहेत. काश्मीरी भाषेंत 'नाग' म्हणजे झरा व 'अनंतनाग' म्हणजे अनंत झऱ्यांचें ठिकाण असा अर्थ आहे. या गांवाला हें नांव अन्वर्थक आहे. कारण, हा सर्व गांवच हिमालयाच्या एका टेकडीच्या पायथ्याशीं वसलेला आहे, व पलीकडे हिमाच्छादित डोंगर आहेत. त्या बर्फाचें वितळून पाणी होऊन डोंगरांत मुरतें, व त्याचे हजारों झरे पायथ्याशीं निघतात. अशी स्थिति असल्यामुळें **अनंतनाग** हें गांव जणूं काय झऱ्यांवर तरंगत आहे, असा भास होतो. गांवांत जातांना आम्हांला गटारांतून सारखें पाणी वहात असतांना दिसत होतें. बाकी हें गांवहि जुन्या श्रीनगराप्रमाणें आम्हांला गलिच्छच वाटलें, आणि घरेंहि सामान्य तऱ्हेचीं व घाणेरडींच दिसलीं. हें शहर व्यापाराकरितां प्रसिद्ध आहे. येथें गालीचे, मेजावरील नक्षीचें कापड वगैरे जिनसा चांगल्या होतात, व लीडर नदीची दरी, मार्तंडाचें देऊळ, अच्छाबलबाग वगैरे प्रेक्षणीय स्थळें पहावयाला जावयाच्या वाटा येथूनच फुटतात.

**अनंतनाग** येथें आम्ही चारपांच तास राहिलों. **वितस्तेच्या** उगमा-कडे म्हणजे **व्हेरनाग** या गांवाकडे जाण्याकरितां आम्ही सुमारें साडे-तीन वाजतां टांग्यांतून निघालों. सकाळीं घोड्यांनीं पांच तासांत आम्हांला पसतीस मैल आणिलें होतें, पण आतां त्यांना पांच तासांची विश्रांति मिळाल्यामुळें ते ताजेतवाने व हुशार झाले होते. अजून आम्हांला सुमारें वीस मैल जावयाचें होतें. **अनंतनाग** सोडल्यापासून सपाटीचा रस्ता संपत चालला, व आम्ही उंचउंच डोंगराकडे जात आहों, असा भास होत होता. रस्ताहि एका टेकडीला वळसा घालून खोलखोल दऱ्यांकडे चालला आहे, असें वाटे. आतां रस्ताहि तितका चांगला नव्हता. आमच्या समोर प्रचंड डोंगर दिसूं लागले. त्या डोंगरांवर खूप झाडी व रान होतें. मधूनमधून बर्फ वितळल्याच्या पांढऱ्या खुणाहि दिसत असत, व डोंग-रांच्या सांधींत पांढरें बर्फहि आढळून येई.

आतां काश्मीरची सपाट दरी संपून दक्षिणेकडील हिमालयाच्या हिमाच्छादित पर्वताकडे आम्ही चाललों होतों. हळूहळू आम्ही **व्हरनाग** गांवाकडे येऊं लागलों, असें स्पष्ट दिसूं लागलें; कारण, आम्ही डोंगराच्या पायथ्याशीं जाऊं लागलों होतों. **झेलम** नदीहि आतां उथळ झाली, आणि मोठ्याशा ओढ्यासारखी दिसूं लागली. **श्रीनगर**पासून **अनंतनाग**पर्यंत झेलम नदी पाण्यानें भरलेली असून त्या नदींत नावा चालतात. पुढें मात्र नदीला खांडवे पडल्यामुळें नावा नेणें शक्य नाहीं. **व्हरनागच्या** अलीकडे नदी ओलांडावी लागते, व मग नदी डावीकडे येते. या ठिकाणीं नदी गोट्यांनीं भरलेली असून पात्र फारच रुंद पण उथळ आहे. यामुळें नदीच्या प्रवाहाचे लहानलहान फांटे झाले आहेत.

आतां **व्हरनाग** अगदीं जवळ आलें असावें, असें वाटलें; कारण, **जम्मू**कडून **श्रीनगर**कडे येणारा रस्ता आम्हांला समोरच्या डोंगरांत दिसूं लागला. या घाटाला **बनिहाल घाट** म्हणतात, व तो **व्हरनाग**पासूनच सुरू होतो. हा रस्ता अजून टांगे जाण्यासारखा नाहीं; पण हा चांगला करण्याची संस्थानची खटपट आहे, असें आम्हांला कळलें.

साडेसात आठांच्या सुमाराला आम्ही एकदांचे **व्हरनाग** गांवीं येऊन पोहोंचलों. येथील शाळा व पोस्ट यांच्या मास्तरांना आम्ही **अनंतनाग**हून चिठी घेतली होती. म्हणून पोस्टाची चवकशी करीतकरीत आम्ही गांवांत शिरलों, व एका लहानशा झोंपडीवजा घराशीं आलों. तेंच पोस्ट ऑफिस असें समजलें. मास्तरनीं आम्हांला दुसऱ्या एका घरीं उतरण्यास नेलें. इतक्यांत एक तीर्थोपाध्याय आमच्याकडे आले. व त्यांनीं ‘ **वितस्ते**चा खरा उगम दाखवितों, ’ असें सांगितलें. त्यांच्या मागोमाग आम्ही बरेंच लांब गेल्यावर त्यांनीं आम्हांला एका लहानशा घराच्या परसांत नेलें, व तेथें पाण्याच्या झऱ्याचें एक तोंडीनीं ओबडधोबड बांधलेलें कुंड दाखविलें. आम्ही त्या उपाध्यायाच्या कृतीचा अर्थ समजलों. तें त्यांचेंच घर असावें, व **अनंतनाग**प्रमाणें या गांवांतहि

पुष्कळ झरे असल्यामुळें त्या उपाध्यायानें आपल्या परसांतील झऱ्याला ओवडधोबड कुंड बांधलें असून भोळसट प्रवाशांना ' वितस्तेचा हा खरा उगम ' असें सांगून त्यांच्याकडून तो उपाध्याय पैसे उकळीत असावा, अशी आमची खात्री झाली; पण आम्ही त्याच्या युक्तीनें फसलों नाहीं. त्याच्या वाट दाखविण्याच्या मेहनतीबद्दल त्याच्या हातावर दोन आणे टाकून आम्ही आपल्या बिऱ्हाडीं परत फिरलों.

आजचा आमचा प्रवास आम्हांलासुद्धां आश्चर्यकारक व आनंदकारक वाटला. आम्ही सकाळीं निघून एकाच टांग्यानें व घोड्याच्या एकाच जोडीवर ५६ मैलांचा प्रवास सायंकाळपर्यंत केला. इतका प्रवास आमच्या इकडच्या घोड्यांना अशक्य आहे, असें आम्हांला वाटलें, व इकडल्या घोड्यांची ताकद व हवेचा थंडपणा पाहून आम्हांला आनंद वाटला.

**तारीख ३० मे**–ज्या मोठ्या झऱ्यापासून **झेलम** नदीचा उगम झाला आहे, तो झरा व त्याजवळची बाग पहाण्यास आम्ही सकाळींच गेलों. येथला देखावा खरोखरीच अद्वितीय आहे. आधींच **व्हरनाग** हें गांव **पीरपंजाल** नांवाच्या हिमालयाच्या हिमाच्छादित पर्वतराजीच्या दुवेळक्यांत वसलेलें आहे; हे पर्वत इतर पर्वतांसारखे उघडेबोडके नसून ते झाडांझुडपांनीं आच्छादलेले आहेत. **व्हरनागचा** झरा अशा एका उंच व छायायुक्त टेकडीच्या पायापाशीं आहे. डोंगरांतून झरा धो धो करीत वहात आहे. या सुंदर ठिकाणीं **जहांगीर** बादशहानें सन १६१२ मध्यें एक अष्टकोनी पुष्करणी बांधविली, व त्याच्याच हुकुमानें सन १६१९ मध्यें, येथें बांधलेल्या पाण्याच्या पाटांनीं युक्त अशा कृत्रिम धबधब्यानें मंडित व कारंज्यांनीं सुशोभित असा एक सुंदर बाग बनविण्यांत आला. हा बाग **निषात** किंवा **शालीमार** यांच्या इतका मोठा नाहीं; पण जीवंत झऱ्याची शोभा व एकंदर सृष्टिसौंदर्य हीं या बागेंत पूर्वोक्त बागेपेक्षां कितीतरी पटीनें अधिक आहेत. या बागेंतहि चिकार झाडें आहेतच. पाण्याचा प्रवाह मनाला विलक्षण आनंद देतो. अष्टकोनाकृति पुष्करणींत

झरा आणून सोडलेला असून तेथून पाट काढलेला आहे. पुष्करणींत १० फुटांच्या वर पाणी असतें. पाण्याचा रंग किंचित् हिरवट दिसतो. या पुष्करणीभोंवतीं ओऱ्यांसारखी अष्टकोनाकृति कमानदार इमारत असून त्या इमारतीच्या भिंतीवर दोन परशियन भाषेंतील शिलालेख* आहेत. या सर्व खाणाखुणांवरून हें ठिकाण मुसलमानी बादशहांचें विलासस्थान असावें, असें उघड दिसतें; पण येथेंसुद्धां एका ओरींत हिंदुदेवाची मूर्ति असून येथले लोक या ठिकाणाला मोठें तीर्थ मानतात व भाविक हिंदूंकडून येथें पैसे उकळण्यांत येतात. ज्या पुष्करणींमध्यें मुसलमानी स्त्रीपुरुषांचे जलविहार झाले अस-

---

*या शिलालेखांसंबंधीं एक विस्तृत व वाचनीय निबंध डॉ. जीवनजी जमशेटजी मोदी यांनीं रॉयल एशिआटिक सोसायटीच्या मुंबईच्या शाखेच्या त्रैमासिकाच्या नुकत्याच निघालेल्या अंकांत (पुस्तक २५ वें अंक १ ला) प्रसिद्ध केला आहे. मोंगल बादशहांनीं व मुसलमान इतिहासकारांनीं काश्मीरच्या महतीबद्दल व सृष्टिसौंदर्याबदल काढलेले उद्गार डॉ. मोदी यांनीं या निबंधांत एकत्र संकलित केले आहेत. त्याचप्रमाणें मोंगल बादशहांच्या काश्मीरच्या प्रवासांची तारीख-वर्षवार सविस्तर माहिती डॉक्टर मजकुरांनीं दिली आहे. अर्थात् या निबंधांत त्यांनीं व्हरनाग येथील परशियन भाषेंतील शिलालेख मूळ जसेच्या तसे छापवून त्यांचा इंग्रजींत अर्थ दिला आहे. हे मूळचे परशियन लेख परशियन जाणणारे माझे नवे मित्र व सहाध्यापक रा. पटवर्धन यांना भाषांतराकरितां दिले व खालील भाषांतर त्यांनीं करून दिलें आहे, याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. त्या शिलालेखांचें शब्दशः भाषांतर असें:—

पहिल्या लेखाचें भाषांतर—

"धर्मयोद्धा महाराज अकबर याचा पुत्र, सप्तद्वीपाधिपति, न्यायप्रसारक, राजाधिराज वीरपिता, धर्मप्रकाश, महाराज जहांगीर यांनीं (आपल्या) राज्यारोहणाच्या पंधराव्या वर्षी या विपुलतायुक्त झऱ्यावर उतरून त्याला मान दिला. हजरतांच्या हुकुमानें या मंदिरास पूर्ण स्वरूप आलें. अकबरशाहच्या जहांगीरशाहमुळें या मंदिराचें शीर (शिखर) गगन (भेदून) वर चढलें. विवेक



नं. १३ व्हरनागचा झरा व पुष्करणी पान ५८



नं. १४ मार्तंडाचें (सूर्याचें) देवालय व आवार पान ५९

तील,ज्या धो धो वहाणाऱ्या झऱ्यांच्या कांठीं पाय टाकून मुसलमान युवयुवतींनीं शृंगारचेष्टा केल्या असतील,जलमंदिरांत स्त्रीपुरुषांचा नर्मपरिहास व जलक्रीडा घडल्या असतील, सारांश, ज्या सृष्टिकृत सुंदर स्थानाला मनुष्यांनीं आपल्या चैनीचें व विलासाचें ठिकाण बनविलें, त्या स्थानाला आमचे हिंदुलोक पवित्र तीर्थ समजतात, व लोकांना भूलथापा देऊन पैसे उकळतात. काय हा आमच्या धर्माची अवनति! केवढा हा धर्मसमजुतीचा वेडगळपणा! याप्रमाणें हें वितस्तेच्या उगमाचें ठिकाण पाहून आनंदाचे व खेदाचे परस्परविरोधी विचार मनांत उद्भवून मुसलमानांच्या सृष्टिसौंदर्यप्रियतेबद्दल व त्यांच्या ललितकलाभक्तीबद्दल कौतुक वाटलें, तर आपल्या भोळसटपणाबद्दल वाईटहि वाटलें.

ही बाग पाहून झाल्यावर फराळ करून आम्ही **अच्छाबल** नांवाच्या प्रसिद्ध बागेकडे निघालों. **व्हरनाग**पासून ती बारातेरा मैल आहे. आम्ही दोनच तासांत आलों. येथून टांग्याला परत **अनंतनाग** येथें जाऊन विश्रांति घेण्यास सांगितलें, व आम्ही **मार्तंडाचें** प्रसिद्ध देऊळ पाहून पायवाटेनें **अनंतनागाला** येतों, तेथपर्यंत घोड्यांना चांगली विश्रांति मिळेल, व मग तावडतोब **श्रीनगराला** जावयाला निघावयास सांपडेल, असें टांगेवाल्याला सांगून आम्ही **अच्छाबल** येथें आल्यावर टांग्याला लावून दिलें. येथें आम्ही सुमारें दहा वाजतां पोहोंचलों.

---

शिल्पकालास याचा काल ( पुढील शब्दांत ) मिळाला. व्हरनागच्या कालव्यावरील राजमहालाची समृद्धि असो.' (सन १६१९)."

दुसऱ्या लेखाचें भाषांतरः—

"ईश्वरा तुझे आभार मानतों. पृथ्वीपति व कालाध्यक्ष यांच्या अनुज्ञेनें हयूदरानें हा जलनिपात व हा कालवा कसे ( सुंदर ) निर्माण केले आहेत. या कालव्यानें स्वर्गांतील कालव्याची कल्पना करून दिली आहे. या कालव्यामुळें काश्मीरच्या चेहेऱ्याला तेज आलें आहे. अव्यक्तांतल्या सरूष नांवाच्या देवदूतानें या कालव्याचा काल ( पुढील शब्दांत ) सांगितला आहे. स्वर्गांतल्या कालव्यापासूनच हा कालवा बाहेर आला आहे. ( सन १६२६ )."

व्हरनागप्रमाणें येथेंहि डोंगरांच्या पायथ्यांतून फार मोठा झरा-झरा कसला लहानसा ओढाच म्हणाना निघतो. या डोंगरावर प्रचंड देवदार आहेत. **व्हरनाग**च्या मागच्या डोंगरावर भुरटें रान आहे. पण येथें देवदाराचे उंचउंच वृक्ष असल्यामुळें येथली शोभा कांहीं विलक्षणच दिसते. हा झरा म्हणजे **दिवलगांव** येथें '**भृंगी**' नांवाच्या गुप्त झालेल्या नदीचा प्रवाह होय, असें म्हणतात. या डोंगराच्या पायथ्यापासून पुष्कळ झरे निघतात. त्यांपैकीं सर्वांत मोठा एक फूट जाडीचा असून तो कारंजासारखा वर उडतो. एक मनुष्य सहज मावेल अशा डोंगराच्या फटींतून तो जोरानें बाहेर येतो. हा देखावा विलक्षण दिसतो. अर्थात् या निसर्गरमणीय ठिकाणीं हा बाग बनविलेला आहे. हा बाग **शहाजहान** बादशहाची मुलगी **जहानारा बेगम** हिनें तयार करविला. या बागेला **बेगमबाग** म्हणतात. हा बाग ४६७ फूट लांब व ४६ फूट रुंद आहे. याच्या सभोंवार दगडी भिंत असून या बागेच्या दोन मजगी आहेत. या बागेंत पुष्कळ फळझाडें आहेत. येथले चिनारवृक्ष तर फारच मोठे आहेत. झऱ्याचें पाणी सर्व बागेंत खेळविलें आहे. त्याचे तीन पाट बांधले असून मधला पाट सोळा फूट रुंद आहे. बाजूचे दोन पाट सहा-सात फूट रुंदीचे आहेत. पाटांमधून पायवाटा बांधून काढलेल्या आहेत. या पायवाटांनीं जातांना या त्रिधारी पाटांची फार मोठी मौज दिसते. मधल्या पाटाच्या दरम्यान तलावासारख्या दोन पुष्करणी बांधलेल्या आहेत. त्यांतली एक मोठी असून तिच्यामध्यें दगडी कामावर एक लांकडाचा मंडप बांधलेला आहे. पाटाच्या पाण्याचे तीन धबधबे केलेले असून त्याचें पाणी बारा फूट उंचीवरून खालीं पडतें. त्यांचें तें शुभ्र स्फटिकवत् पाणी व पाण्याची बारा फूट खालीं पडणारी धार फार आल्हादकारक वाटते. **निषात** व **शालीमार** बागेप्रमाणें या बागेंतहि मधूनमधून कारंजीं केलीं आहेत; पण तीं वरील बागेप्रमाणें विस्तृत प्रमाणावर नाहींत. येथेंहि ट्राऊट माशाची उपज करण्याची नुक्तीच व्यवस्था करण्यांत आली आहे.

श्रीनगरच्या इतर बागांप्रमाणेंच ही बाग म्हणजे काश्मीरचा एक अलंकार आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. आतां आमच्या मागें टांग्याचा लकडा नव्हता म्हणून आम्ही या बागेंत चांगले दोनतीन तास घालविले, व बागेंतील प्रेक्षणीय भाग दोनदोन तीनतीन वेळ पाहिले. बारांचा सुमार झाला होता, तरी बागेंत गारच वाटत होतें; इतकी येथील हवा थंड आहे. येथून मार्तंडाचें देऊळ सहा साडेसहा मैलांवर असून तेथून **अनंतनाग** पांचसाडेपांच मैल होतें. इतका पायीं प्रवास करण्याचें आम्हांला कांहींच वाटलें नाहीं; पण आमच्याबरोबर प्रो. **अप्रकाशचंद्र** बाबू होते. ते थोडेसे स्थूल असल्यामुळें त्यांना इतका प्रवास पायीं झेपेल किंवा नाहीं, याची शंका होती. म्हणून आम्ही तेथें भाड्यानें घोडीं मिळाल्यास पाहूं लागलों. त्याप्रमाणें एक घोडेवाला तीन घोडीं घेऊन आला तीं साधारण भाड्याच्या घोड्यांसारखीं दिसत होतीं. माझ्या बंधूंना घोड्यावर बसण्याची संवय होती; परंतु मी घोड्यावर आजन्मांत कधीं बसलों नव्हतों. यामुळें माझ्या मनांत धाकधुकच वाटत होती. घोडेवाला एकएक रुपया मागूं लागला, व शिवाय 'सर्व पैसे आगाऊ द्या' असें म्हणूं लागला. तेव्हां आम्ही तसें करण्याचें साफ नाकारलें, व पायींच जाण्याचें ठरविलें. यामुळें मला मनांतून आनंदच वाटून कधीं न अनुभवलेल्या संकटांतून आपली सुटका झाली, असें वाटलें.

आम्ही पायींच वाट चालूं लागलों. हा गाडीचा रस्ता नसून पायवाट होती. यामुळें रस्त्यावर झाडी वगैरे कांहीं नव्हती. **अच्छाबलकडून मार्तंडाच्या** देवळाकडे जाणारा रस्ता चढावाचा आहे; कारण **अनंतनाग** व **अच्छाबल** यांच्यामध्यें मोठा थोरला एक पठार आहे. अशा पठारजमिनीला काश्मीरी भाषेंत **केरवा** म्हणतात. हे केरवे फार सुपीक असतात. **अच्छाबलकडून** चढून आम्ही वर पठारावर आलों, तों जिकडेतिकडे पाणीचपाणी व सुंदर शेतें दिसूं लागलीं. कांहीं शेतांत भाताची लागवड चालली होती. कांहीं शेतें पाण्यानें भरून तुडुंब झालीं होतीं. कांहींत हिरवींगार लावणीच्या भाताचीं रोपें तयार झालीं होतीं. कांहीं

शेतांत नांगरणी चालली होती. अशा तऱ्हेनें त्या सर्व पठारावर शेतकीचें काम जारीनें चालू होतें. या सर्व पठारावर **लीडर** नांवाच्या नदीच्या कालव्याचें पाणी खेळविलेलें आहे; मुख्य कालव्याचे लहानलहान पाट काढून सर्व पठाराच्या शेतीला पाणी दिलेलें आहे. असे लहानलहान कालवे आम्ही किती तरी ओलांडले. शेवटीं आम्हांला **लीडर** नदीचा मुख्य कालवाहि लागला. हा एका डोंगराच्या धारेवरून आणलेला आहे. ती डोंगराची धार आम्हांला दूरवर दिसत होती. या पठारावरून हिमालयवलयांकित काश्मीरच्या दरीची चांगली कल्पना आली. या लांबट सपाट दरीच्या चाऱ्ही बाजूंना हिमालयाचा जणूं काय तटच बांधलेला आहे, असें वाटलें. जिकडे पहावें तिकडे हिरवे पांढरे डोंगरच डोंगर ! अशा तऱ्हेनें सृष्टिशोभा पहातपहात चालल्यामुळें आमचा प्रवास सावकाश झाला खरा; पण त्यामुळें थकवा मुळींच वाटला नाहीं.

अडीचाच्या सुमाराला आम्ही **मार्तंडाच्या** भव्य देवळाजवळ आलों. हें देऊळ लहानशा उंचवट्यासारख्या टेकडीच्या पायथ्याशीं आहे. आसपास झाडेंझुडपें किंवा वसती मुळींच नाहीं. थोडीशीं घरें आहेत; पण तीं देवळापासून बरींच दूर आहेत. अशा या निर्जन व निर्वन स्थळीं हें देऊळ कां बांधण्यांत आलें, याचें आम्हांला आश्चर्य वाटलें; पण असेंहि मनांत आलें कीं, जुन्या काळीं कदाचित् येथें मोठें शहरहि असेल. मात्र काळाच्या सपाट्यानें व भूकंपासारख्या सृष्टीच्या अनर्थानें शहर गडप होऊन गेलें असेल; किंवा धर्मवेडानें या शहाराचा व देवळाचा नाश केला असेल. पंजाबांतील विद्यापीठाचा असाच नायनाट होऊन अर्वाचीन काळीं तेथील सर्व इमारती डोंगरांत गडप झालेल्या उकरून काढाव्या लागल्या. त्याच प्रकारचें स्थित्यंतर येथेंहि झालें असावें. हे विचार मनांत येत आहेत तों आम्हीं मार्तंडाच्या प्रवेशद्वाराजवळ आलों. त्या दाराचें तें प्रचंड काम पाहून आणि त्यावरील नक्षीचें व मूर्तीचें बारकाईनें निरीक्षण करून आम्ही थक्कच झालों. सातसात आठआठ फूट उंचीचे तीन तीन फूट लांबीरुंदीचे एकसंधी दगड दरवाजाला लावलेले

आहेत ! एवढाले प्रचंड दगड वर तरी कसे चढविले असतील, यांचें आम्हांला आश्चर्य वाटलें.

प्रवेशद्वारांतून आम्ही आंत गेलों, तों फारच प्रशस्त असें खुलें चौकोनी पटांगण लागलें. त्याच्या मधोमध सूर्याचें देऊळ व गाभारा होता. पटांगणाभोंवतीं सर्व दगडी बांधकामाच्या कमानदार दरवाज्यांच्या व खिडक्यांच्या ओऱ्यांवजा इमारती होत्या. ज्याप्रमाणें मुसलमानी मशिदीचा घाट व आकार अगदीं ठरलेला, फरक काय तो मशिदीच्या विस्ताराचा, त्याला वापरलेल्या कमीअधिक उंची दगडांचा आणि कमी अधिक कलाकुशलतेच्या कामाचा, बाकी सर्व बांधणी ठरलेल्या धाटणीवर, तीच तऱ्हा काश्मीरांतील देवळांची दिसली. **पनरतन**सारखें छोटेखानी देऊळ असो किंवा **अवंतिपुरच्या** अवंतीश्वरासारखें विस्तीर्ण देऊळ असो, किंवा मार्तंडासारखें वास्तुकलेचा व मूर्तिकलेचा मूर्तिमंत मासला असलेलें देऊळ असो, सर्व देवळांचा घाट व तऱ्हा एकच ! पहिल्यानें एक विस्तीर्ण चौकोनी इमारत असावयाची, व मध्यें मुख्य देऊळ असावयाचें ! मार्तंडाच्या देवळाचें वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे. हिंदुस्थानच्या ललितकलेबद्दल—त्यांपैकीं विशेषतः वास्तुकला व मूर्तिकला यांबद्दल—ज्यांनीं ज्यांनीं म्हणून लिहिलें आहे, त्यांनीं त्यांनीं या देवळाच्या कामाची तारीफच केली आहे; इतकें या देवळाचें काम अपूर्व आहे. **व्हिन्सेंट स्मिथ**साहेबांनीं हिंदुस्थानच्या ललितकलांबद्दल मोठा सचित्र ग्रंथ लिहिला आहे. त्यांत या देवळाचें वर्णन आहे. तसेंच हिंदुस्थानच्या ललितकलांचे अभिमानी गृहस्थ **बर्डवुड व फर्ग्युसन** या दोन साहेबांनींहि या देवळाच्या कलेबद्दल तारीफ केली आहे.

या देवळाच्या भव्यतेची कल्पना शब्दांनीं देणें शक्य नाहीं. आतां हें देऊळ बरेंच मोडकळीला आलेलें आहे. देवळाच्या नुसत्या भिंतीच कांहीं ठिकाणीं उभ्या आहेत; बरेंच छप्पर पडून गेलें आहे. या देवळाचा गाभारा फार मोठा नाहीं; पण त्याला जोडून दोन्ही बाजूंना इमारती बांधल्यामुळें त्याला भव्यता आली आहे. देवळाच्या बाहेरच्या चौकाला

दर्शनी खांब व कमानी यांची रांगच रांग आहे व त्यांची संख्या चव-ऱ्यायशीं आहे. चौकाची लांबीरुंदी दोनशें फुटांच्या वर आहे. पूर्वी या चौकांत पाटाचें पाणी खेळविलें होतें, असें म्हणतात. हें देऊळ मूळचें बरेंच जुनें असावें. तें **रामादित्य** नांवाच्या काश्मीरच्या हिंदु राजानें बांधलें, असा समज आहे. पण **रामादित्याच्या** कारकीर्दीच्या काळाबद्दल निश्चयात्मक असें कांहींच सांगतां येत नाहीं. बाहेरच्या कमा-नदार चौकाचें काम **ललितादित्य** नांवाच्या राजानें केलें, असा राज-तरंगिणींत स्पष्ट उल्लेख आहे. **ललितादित्याची** कारकीर्द इ. स. ६९९ पासून ७३५ पर्यंत होती, हें निश्चित आहे. तेव्हां हें देऊळ हजार वर्षांचें जुनें आहे, यांत शंका नाहीं.

या देवळाचा असा एक विशेष आहे, कीं, काश्मीरच्या इतर सर्व देवळांप्रमाणें हें देऊळ महादेवाचें नाहीं, तर तें सूर्याचें आहे. सूर्य ही जरी हिंदुलोकांनीं देवता मानली आहे, संध्येंतील गायत्रीचा मंत्र जरी सूर्याच्या स्तुतिपर आहे, तरी सूर्याचीं देवळें हिंदुस्थानांत क्वचित् कोठें असतील.

आम्ही देऊळ पहात असतां आम्हांला शेजारच्या गांवांतले एकदोन ब्राह्मण भेटले. त्यांपैकीं एकानें ‘ येथें आसपास कॉलरा झाला आहे, तसेंच **मटन** या प्रसिद्ध तीर्थाच्या ठिकाणींहि हा वाखा थोडासा सुरू आहे,’ असें सांगितलें. हें ऐकून आम्ही **मटन** झऱ्याला जावयाचा बेत रहित केला. तो येथून मैल दीड मैलच असल्यामुळें आमचा तेथें जावयाचा प्रथम विचार होता. त्या वेळीं आम्हांला फार भूक लागली होती, तरी **अनंतनागाला** जाईपर्यंत तोंडांत पाणीहि घालावयाचें नाहीं, असा आम्हीं निश्चय केला.

मार्तंडाचें देवालय व त्याच्या आसपासचा देखावा पहाण्यांत आम्हीं सुमारें दोन तास घालविले, आणि नंतर **अनंतनागाला** जावयास निघालों. आम्ही तेथून निघालों, तों दोन अडीचांचा सुमार झाला होता.

येथून **अनंतनाग** फक्त पांचच मैल होतें. शिवाय, रस्ताही उताराचा होता. तेव्हां आम्हांला फार वेळ लागण्याचें कारण नव्हतें. पण आमच्या बरोबर स्थूलदेही प्रो. **अप्रकाशचंद्र** बाबू होते, त्यांना आतां चालवेनासें झाल्यामुळें आम्हांला हे पांच मैल चालण्यास दोनअडीच तास लागले !

आम्ही पांचाच्या सुमाराला **अनंतनाग** येथें जाऊन पोहोंचलों. आम्ही पहिल्यानें ज्या बाजूनें गांवांत शिरलों, त्याच्या दुसऱ्या बाजूनें गांवांत शिरल्यामुळें आम्हांला मास्तरसाहेबांचें घर सांपडण्यास बराच त्रास पडला. शेवटीं एकदांचें आम्ही त्यांचें घर तर गांठलें, परंतु मास्तर साहेब घरीं नव्हते. मास्तरीणबाईंना तर पडद्याच्या चालीमुळें बाहेर येतां येईना. पण बाई फार चांगल्या होत्या. त्यांनीं एका लहान मुलाकडून आम्हांला बसण्यास सांगितलें, व मास्तरांना निरोप पाठविला.

थोड्याच वेळांत मास्तरसाहेब घरीं आले, व त्यांनीं आम्हांला फराळ करण्याचा आग्रह केला. पहातों तों त्यांनीं फराळाचें आणलेंसुद्धां ! हें पाहून आम्हांला आश्चर्य वाटलें; पण आम्हीं तर्क केला, कीं, आम्ही घरीं आल्याबरोबर त्यांच्या गृहिणीनें फराळाचें करण्यास प्रारंभ केला असावा. फराळाला सुंदर पोळ्या आणि तर्कारी होती. त्या पोळ्या मांड्यासारख्या पातळ व तलम होत्या. गाडगें चुलीवर उलटें टाकून त्यावर या पोळ्या करतात, असें आम्हांला सांगण्यांत आलें. मास्तरीणबाईंचा सुग्रणपणा पाहून आम्हांला फार कौतुक वाटलें. आम्हांला सबंद दिवसाचा उपास असल्यामुळें आम्हीं फराळाचा चांगलाच समाचार घेतला, हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं.

मास्तरांनीं केलेल्या आमच्या आदरातिथ्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानून आम्ही मार्गस्थ झालों. व आल्या वाटेनें जाऊन रात्रीं सुमारें ११ वाजतां श्रीनगरांत आमच्या बिऱ्हाडीं सुखरूप येऊन पोहोंचलों.

---

# प्रकरण ५ वें

## श्रीनगरनिवासाची अखेर

तारीख ३१ मे—आज आमच्या नंदनवननिवासाचा शेवटला दिवस होता. तारीख १ जून रोजीं पहांटेला स्वदेशीं परत जाण्याकरितां निघावयाचा बेत ठरला होता. आज सर्व दिवसभर आमच्या मनाला वाईट वाटत होतें. इतक्या थोड्या मुदतीनें आम्ही या ठिकाणीं आलों, हा मोठा वेडेपणाच आम्हीं केला, असें आम्हांला सारखें वाटत होतें. या प्रचंड व नैसर्गिक नंदनवनाचा एकशतांशहि आम्हीं पाहिला नाहीं, असें आमच्या ध्यानांत आलें. **सोनामार्ग**, **गुलमार्ग**, यांसारखीं शीतलनिवासस्थानें; **नंगापर्वत**, **हरमूख**, **अमरनाथ**, वगैरेसारखीं पंधरा हजार फुटांवर उंच असलेलीं हिमाच्छादित शिखरें; **लिद्दर**, **सिंध**, **बृंगी** यांसारख्या जलपूर्ण नद्या; **वुलर**, **मानसबल**, **गंगाबल**, **नीडसार** यांसारखीं सुंदर सरोवरें; **बनिहल**, **पीरपंजाल**, **झोझीला** यांसारखे निसर्गरमणीय घाट; **गुप्तगंगा**, **सुखनाग**, **नीलनाग**, **गौतमनाग** यांसारखे सतत वहाणारे निर्झर; निसर्गकृत वनराजि व मनुष्यकृत बागबगीचे; मनोहर फुलें फळें; हिममय गुहा व हिममय पर्वत; चित्रविचित्र पशुपक्षी, यांप्रमाणें कितीतरी गोष्टी या नंदनवनामध्यें पहाण्यासारख्या आहेत. पण कालाभावामुळें आम्हांला त्यांचें दर्शन घेतां आलें नाहीं.

परंतु आतां या विलापाचा काय उपयोग होता ? दुसऱ्या दिवशीं निघणें आम्हांला भागच होतें. आणखी कांहीं दिवस तरी या नंदनवनांत आम्हांला रहावयाला सांपडलें असतें, तर किती बरें झालें असतें, असें आम्हांला राहूनराहून वाटत होतें; पण हें आमचें वाटणें, 'पश्चात् बुद्धि बामाणिया' या म्हणीपैकींच होतें. तेव्हां मीं आपल्या मनाशीं निश्चय केला, कीं, जर कधींकाळीं—अर्थात् या ' कधींकाळींचा ' फारसा संभव नव्हता-मला

पुनः नंदनवनांत येण्याचा प्रसंग आला, तर आतां केली ही चूक न करितां येथें दोन महिने रहाण्याच्या बेतानें यावयाचें, नाहींतर इतका पैसा खर्च केल्याबद्दल आणि इतका त्रास व मेहनत केल्याबद्दल पश्चात्ताप मात्र व्हावयाचा. तसेंच काश्मीरच्या प्रवासाबद्दल माझी कोणीं सल्ला घेतली, तर, ' तीन महिन्यांची तरी फुरसत असल्याशिवाय व तीनचारशें रुपये तरी खर्चण्याची तयारी असल्याशिवाय हा प्रवास कोणीहि करूं नये, ' असें त्याला निक्षून सांगण्याचा मीं मनाशीं निश्चय केला.

आज आमच्या येथल्या निवासाचा शेवटला दिवस असल्यामुळें आम्हीं प्रथमतः येथें नवीन झालेल्या मित्रमंडळींच्या भेटी घेतल्या, व शेवटीं बिजलीबाबूंकडे गेलों. त्यांना धनजीभाईच्या डांकेच्या टांग्यांत दोन स्वाऱ्यांचीं तिकिटें विकत घेण्यास आम्हीं सांगितलें व त्यांनींहि तिकिटें आणवून ठेवण्याचें कबूल केलें. आम्हांला पैशांचा तोटा आला होता, म्हणून आम्हीं घराकडून तारेनें पैसे मागितले होते. ती मनीऑर्डर बिजलीबाबूंना देण्याबद्दल पोस्टमास्तरांना पत्र लिहून तें बिजलीबाबूंजवळ दिलें, व त्यांच्याकडून मनीऑर्डरचे पैसे आगाऊ घेतले. इतकें काम झाल्यावर थोडा वेळ त्यांच्याशीं कांहीं संभाषण करून व आम्हांला आमच्या येथील प्रवासांत मदत केल्याबद्दल त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानून आम्ही बिजलीबाबूंचा निरोप घेतला, आणि बिऱ्हाडीं परत आलों.

काश्मीरच्या प्रवासाची व नंदनवनांतील निवासाची कायमची अशी कांहीं तरी खूण आपल्याजवळ रहावी म्हणून तेथल्या कांहीं विशेष चिजा विकत घेण्याचा आम्हीं बेत केला होता; म्हणून त्या खरेदी करण्याकरितां आम्ही नंतर **अप्रकाशचंद्र**बाबूंबरोबर बाजारांत गेलों. तेथें काश्मिरच्या नक्षीचे मासले म्हणून मेजावर घालण्याचे नक्षीदार रुमाल; उशांचे अभ्रे वगैरे थोडेसें कापड खरेदी केलें. नंतर लांकडाच्या नक्षीच्या कामाचे नमुने म्हणून दोन लांकडी पेट्या घेतल्या; तसेंच ' पेपरमॅची ' नांवाच्या धंद्याचे मासले म्हणून लहान मुलांचीं खेळणीं व इतर उपयुक्त वस्तु

खरेदी केल्या, व काश्मीरांतील शिकारे ( होड्या ), नौकागृहें यांचे निरनिराळ्या प्रकारचे लहान प्रमाणावरचे नमुने विकत घेतले, व शेवटीं काश्मीरच्या देखाव्यांचे निरनिराळे फोटोहि घेतले. ते फोटो तयार ठेवण्याबद्दल आम्ही एका फोटोग्राफरला आधींच सांगून ठेवलें होतें, व फोटोहि आम्हीं पसंत करून ठेविले होते.

याप्रमाणें सामानाची खरेदी करून आम्ही बिऱ्हाडीं आलों, आणि अप्रकाशचंद्रबाबू व घोषबाबू यांच्यासह आम्हीं भोजन केलें. त्यांनीं आज आमच्याकरितां थोडा मेजवानीसारखा बेत केला होता. जेवण झाल्यावर आम्हीं थोडी विश्रांति घेतली. तितक्यांत अप्रकाशबाबू आपलें कॉलेजचें काम संपवून आले. आम्ही दोनप्रहरचा चहा घेऊन बाहेर पडलों, व शिकाऱ्याच्या अड्ड्यावर जाऊन बऱ्याच तासांच्या बोलीनें एक शिकारा ठरवून त्यांत बसलों, व झेलमनदींतून पुनः एकदां सर्व शहर पहाण्यास निघालों.

आम्ही झेलमनदीच्या कालव्याच्या ठिकाणीं शिकाऱ्यांत बसलों, व तेथून लवकरच झेलमनदीवरील 'अमीराकडाल' नांवाच्या पहिल्या पुलाखालीं आलों. हा पूल दगडी कमानीचा असून त्याचा वरचा सर्व भाग लोखंडी तुळयांचा व लोखंडी कठड्यांचा आहे. हा पूल अगदीं पक्का आहे. हा सन १८९६ मध्यें बांधून तयार झाला. आम्ही नदीच्या ओघाबरोबर खालीं चाललों होतों, यामुळें आमच्या शिकाऱ्याचा वेग बराच होता. नदीच्या दुतर्फा शहरांतील लहानमोठ्या इमारती दिसत होत्या, व नदीच्या कडेला मधूनमधून नौकागृहें दिसत होतीं. हा सर्व देखावा अपूर्व पण नयनमनोहर वाटला, यांत शंका नाहीं. घरांच्या मधूनमधून हिंदु देवळांचीं उंच शिखरें व मुसलमानी मशिदींचे मनोरे दृग्गोचर होत होते.

झेलमनदीवर शहराच्या भागामध्यें एकंदर सात पूल आहेत. ते सर्व लांकडी व कच्चे आहेत. आम्ही दुसऱ्या पुलाच्या कमानीमधून गेलों,



नं. १५ झेलम नदी व पर्वतराजीचा दुरून देखावा पान ६८



नं. १६ श्रीनगरांतील झेलमवरचा लाकडी पूल पान ६९

तेव्हां आम्हांला त्याची बांधणी समजली. आपल्याइकडे कांहीं कांहीं विहिरी ज्याप्रमाणें लांकडी तुळया चौकोनाकृति एकावर एक टाकून बांधतात, त्याप्रमाणें या पुलांचे खांब केलेले आहेत, व मधल्या चौकोनी पोकळींत दगड रोडे भरलेले आहेत. या व्यवस्थेमुळें पूर आला असतां पाण्याला अडथळा न होतां पाणी खांबांच्या भेगांमधून निघून जातें. अशा तऱ्हेनें खांबांची बरीच उंची साधल्यावर तुळईच्या वरच्या चव-कटीला आडवे मोठमोठे लांकडी धिरे देऊन त्यांवर मग सपाट तुळयांच्या रांगा टाकल्या आहेत, व मग त्यांवर तक्तपोशी केली आहे. अशा तऱ्हेचे हे लांकडी पूल हलके होऊन पुरांत वाहून जाण्याची भीति कमी असते. येथें कायमचे दगडी पूल बांधण्याचें काम विलक्षण खर्चाचें आहे. कारण, नदीला सतत पाणी असून जमिनीखालीं पुष्कळ खोलीपर्यंत खडक लागत नाहीं, यामुळें ही कमी खर्चाची पुलाच्या बांधकामाची युक्ति येथें योजलेली आहे. तिसऱ्या पुलाच्या शेजारीं काश्मीरच्या महाराजांचा राजवाडा आहे. येथें शहराच्या अगदीं वरच्या भागाकडे नदीच्या उजव्या बाजूला काढलेला फांटा नदींत येऊन मिळतो. तो राजवाड्याच्या तटाला अगदीं लागून जातो, व नदींत येऊन मिळतो. यामुळें येथें पाण्याला ओढ पुष्कळ आहे. राजवाड्यासमोर चांगल्या दगडी पायऱ्यांचा घाट आहे. घाटाच्या जरा खालीं गेलें कीं, लागलीच नदीच्या डाव्या बाजूच्या कालव्याला सुरवात होते. यामुळें नदीचें पात्र येथें बरेंच रुंदावलेलें दिसतें, आणि नदीकडून व उजव्या बाजूच्या फांट्याकडून जोराचे दोन प्रवाह एकत्र येऊन हे डाव्या बाजूच्या फाट्यांत व नदीच्या खालच्या भागाकडे जोरानें जातात. येथला देखावा खरोखरीच फार रमणीय आहे, पण येथें शिकारा थांबविणें किंवा तो हलके हलके चालविणें बरेंच कठीण आहे.

तिसऱ्या आणि चवथ्या पुलांच्या दरम्यान '**शहामहादन**' नांवाची लांकडी प्रचंड इमारत दृष्टिपथांत येते. ही चवदाव्या शतकांत पराशियांतून काश्मीरला आलेल्या एका साधूच्या स्मरणार्थ बांधलेली मशीद किंवा

मुसलमानी मंदिर आहे. याच साधूनें काश्मीरांत मुसलमानी धर्माचा फार प्रसार केला, असें म्हणतात. ही मशीद याच ठिकाणीं असलेल्या '**कालिश्री**' नांवाच्या हिंदु देवळाच्या सामानानें बांधलेली आहे, असें सांगतात. हिंदु लोक अजून या ठिकाणीं काली देवीची पूजा करतात. याच्या समोरच नदीच्या दुसऱ्या बाजूला **पठार मशीद** नांवाची **नूरजहान** राणीनें बांधलेली मोठी दगडी मशीद आहे. चवथ्या पुलाच्या खालीं नदीच्या उजव्या बाजूला **महाश्री** नांवाचें पांचमजली देवालय आहे. सहाव्या पुलाच्या जरा पलीकडे **स्कंधभवनाच्या** देवळाचा जीर्णभाग आहे. सातव्या पुलाच्या खालीं व जेथें **दूधगंगानदी झेलम-नदीला** येऊन मिळते तेथें **क्षेमगौरीश्वर** नांवाचें एक महादेवाचें देवालय आहे. या पुलाच्या पलीकडे शहर संपतें; म्हणून येथून आम्ही परत फिरलों, आणि पुन: सर्व शहराची, देवळांच्या व मशिदींच्या शिखरांची, व नदींतील लहानमोठ्या नौकागृहांची शोभा पहात पहात नदीच्या वर चाललों.

आतां आम्ही नदीच्या ओघाविरुद्ध जात असल्यामुळें आमचा शिकारा फार सावकाश चालला होता. शेवटीं, आम्ही निघालों त्या ठिकाणीं आलों, व तेथून नदीच्या कालव्यांतून चिनारबागेकडे चाललों. नदीच्या मुख्य प्रवाहाच्या कडेला फारशीं नौकागृहें लागलीं नाहींत पण आतां जिकडेतिकडे लहानमोठीं नौकागृहें लागूं लागलीं. कांहीं कांहीं नौकागृहें टेबलें, खुर्च्या, आरामखुर्च्या, खिडक्यांचे पडदे, आरसे वगैरे अर्वाचीन तऱ्हेच्या सुखसोयी व सामान यांनीं भरलेलीं दिसत होतीं. कांहींवर विजेच्या दिव्यांचीही तजवीज केलेली पहाण्यांत आली. खरोखरीं नदीच्या या भागांत आलें म्हणजे सर्व शहरांतील घरें काय नदींत विहाराकरितां उतरलीं आहेत असा भास होतो.

थोड्याच वेळांत आम्ही चिनारबागेपाशीं आलों. या ठिकाणाला बाग कां म्हणतात हेंच आम्हांला समजेना. या ठिकाणाला बागेचा मुळींच आकार नाहीं. हें ठिकाण म्हणजे नदीच्या निरनिराळ्या फांट्यांमधली एक

बेटवजा जागा आहे, व येथें प्रचंड चिनारवृक्ष आहेत, इतकेंच; पण हें ठिकाण फार थंड आहे. येथें चिनारांची खूब गर्दी असल्यामुळें येथें नेहमीं सांवली असते. आम्ही थोडा वेळ येथें थांबलों. कांहीं युरोपियन स्त्रिया व पुरुष येथें बसलेलीं दृष्टीला पडलीं. येथें विवाहेच्छु युरोपियन युवयुवती प्रेमालापाकरितां व प्रेमविहाराकरितां येतात, असें **अप्रकाशचंद्र** बाबूंनीं आम्हांला सांगितलें, व या स्थळाच्या शांत, निवांत, शीतल स्वरूपावरून बाबूसाहेबांचें म्हणणें खरें असावें, असें आम्हांलाही वाटलें.

आतां बरीच संध्याकाळ होत चालली होती, व आम्ही शिकाऱ्याचा बराच वेळहि घेतला होता; म्हणून नाइलाजास्तव आम्ही शिकाऱ्यांत बसलों, व शिकाऱ्याच्या अड्ड्यावर परत आलों. शिकारावाल्याचे पैसे चुकते करून व शिकाऱ्यांत पुष्कळ वेळ राहिल्याबद्दल त्याला थोडी चिरीमिरी देऊन आम्ही आपल्या बिऱ्हाडीं आलों. झालें! नंदनवनापैकीं एका आठवड्यांत जेवढें पहाणें शक्य होतें तेवढें आम्हीं पाहून घेतलें, म्हणून आम्हांला समाधान वाटलें; पण अधिक पहाण्यास सवड नाहीं, म्हणून वाईट वाटल्याखेरीजहि राहिलें नाहीं.

अशा मिश्रविकारांच्या मनःस्थितींत आम्हीं आपलें तेथलें शेवटचें भोजन आटोपलें, आणि सामानाची बांधाबांध करून व बराच वेळपर्यंत बाबूद्वयांजवळ आमच्या प्रवासाबद्दल व इतर खाजगी गोष्टींबद्दल बोलत बोलत झोंपीं गेलों. पहांटे पांच वाजतांच आमचा डाकेचा टांगा निघावयाचा होता. आमच्या प्रत्यागमनाच्या हकीकतीस लागण्यापूर्वीं पुढील प्रकरणांत काश्मीरचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास यांचें थोडेसें दिग्दर्शन करण्याचा बेत आहे.



# प्रकरण ६ वें

## काश्मीरचा दंतकथात्मक इतिहास
### ( कौरवपांडवकाळ ते सन ५९९ )



**सबंद** हिंदुस्थानच्या पुरातन इतिहासासंबंधीं अनिश्चितता, त्रुटितपणा व गोंधळ असतांना त्या देशाच्या आग्नेय दिशेस असलेलें **लंका** बेट व वायव्य दिशेस असलेलें **काश्मीर** खोरें या प्रांतांचा संगतवार, सविस्तर व सलग पुरातन इतिहास उपलब्ध असावा ही मोठ्या नवलाची पण कौतुकास्पद गोष्ट वाटते. पण तशीच वस्तुस्थिति आहे खरी. **लंका** बेटाचा अर्वाचीन काळापर्यंतचा संगतवार, सनवार, सलग व सविस्तर इतिहास ज्याप्रमाणें **महावंस** व **चूलवंस** या पालीग्रंथांमध्यें मिळतो त्याप्रमाणें काश्मीर खोऱ्याचा तसाच इतिहास **राजतरंगिणी** व त्याच्याच पुरवणीवजा लिहिलेल्या **राजावली जैनराजतरंगिणी** व **राजावलीपिटक** या संस्कृत ग्रंथांमध्यें मिळतो. या ग्रंथांच्या व इतर साधनांच्या आधारानें काश्मीरचा समग्र इतिहास लिहिलेला आहे. त्याचाच सारांश या व पुढील कांहीं प्रकरणांत द्यावयाचा विचार आहे.

काश्मीरच्या इतिहासाचीं साधारणपणें चार पर्वें पडतात. पहिलें पर्व कौरवपांडव कालापासून सन ५९९ पर्यंतचें पडतें. या कालखंडांतील हकीकत बरीच दंतकथात्मक व असंभवनीय असल्यामुळें कमी विश्वसनीय आहे. दुसरें पर्व कर्कोटक राजवंशापासून सन १३३८ पर्यंतचें पडतें. या सात आठशें वर्षांमध्यें हिंदुधर्मी व बुद्धधर्मी राजांचा काश्मीरावर अंमल चालू होता. तेव्हां या पर्वाला हिंदु कारकीर्द म्हणतां येईल. तिसरें पर्व सन १३३८ पासून सन १८१९ पर्यंतचें पडतें. या पांचशें वर्षांमध्यें मुसलमानधर्मी राजांचा काश्मीरवर अंमल चालू होता.

तेव्हां या पर्वाला मुसलमानी कारकीर्द हें नांव शोभतें. चवथें व शेवटचें पर्व सन १८१९ पासून आज तागाईतचें होय. या पर्वामध्यें पुन्हा हिंदु राजवट प्रस्थापित होऊन ती सध्यां चालू आहे.

या प्रकरणांत पहिल्या पर्वाचें पर्यालोचन करावयाचें आहे. या व पुढच्या पर्वाची माहिती **कल्हणाच्या राजतरंगिणी** या ग्रंथांत आलेली आहे.

कल्हण हा कवि काश्मीरचा राजा **जयसिंह** (सन ११२८ ते ११५५) याचा समकालीन होता. **जयसिंहा**पूर्वीचा राजा **हर्ष** याच्या पदरीं असलेल्या **चंपकप्रभू** नांवाच्या मोठ्या मुत्सद्दी मंत्र्याचा कल्हण हा मुलगा होता. यामुळें त्याला त्याच्या काळची व त्याच्या पूर्वीच्या पांच-पन्नास वर्षांची माहिती प्रत्यक्षप्राय होती. त्या काळापूर्वीची माहिती त्यानें दंतकथांवरून व पूर्वीच्या ग्रंथांवरून मिळविली. अशी प्रत्यक्ष, ऐकीव व कागदपत्री माहिती मिळवून **कल्हणानें** आपला **राजतरंगिणी** हा आठ तरंगांचा ( अध्यायांचा ) प्रचंड ग्रंथ सन ११४८ ते ११५० च्या सुमारास लिहिला. पहिल्या तीन तरंगांमध्यें कौरवपांडव काळापासून **कर्कोटक** नाग राजघराण्याच्या सुरवातीपर्यंतची माहिती आली आहे. अर्थात् ही माहिती दंतकथात्मक व असंभवनीय कोटींपैकीं आहे. असो. काश्मीरचा पहिला राजा **गोनंद** हा कौरव-पांडवांचा समकालीन होता. **तो जरासंधाचा** मित्र होता. **जरासंधानें श्रीकृष्णाच्या मथुरेवर** स्वारी केली. त्या स्वारीच्या मदतीला **गोनंद** आपल्या सैन्यासह आला होता. पण या लढाईंत तो मारला गेला. या दंतकथेपासून **कल्हणानें** आपल्या काश्मीरच्या इतिहासास सुरवात केली आहे. भारतीय युद्धाचे वेळीं **गोनंदाचा** नातू लहान बालक होता म्हणून तो या महायुद्धांत सामील झाला नव्हता. त्याचे पुढील पसतीस राजे नामशेष झाल्यामुळें त्यांची माहिती मिळत नाहीं असें **कल्हण** म्हणतो. **गोनंद** राजाची कारकीर्द कलियुग प्रारंभकालीन होय अशी दंतकथा असल्यामुळें ऐति-

हासिक काल व कलिकाळ यामधला मोठा कालखंड भरून काढण्या करितां या पसतीस राजांच्या **नामशेषत्वाची** कल्पना कल्हणानें काढली असावी. पुढील आठ राजांचा **कल्हणानें** निवळ नामनिर्देश केला आहे. नंतर हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत प्रसिद्ध असलेले ऐतिहासिक राजे गोनंद राजघराण्यांतील होते म्हणून म्हटलें आहे. याचा इत्यर्थ इतकाच कीं, या काळांत **काश्मीर** प्रांत हिंदुस्थानच्या चक्रवर्ती राजांचा अंकित झाला होता. त्या राजांपैकीं पहिला राजा **अशोक** हा होय. यानें **काश्मीरांत** पुष्कळ स्तूप, चैत्य व विहार बांधले व त्यानेंच **श्रीनगर** शहर वसविलें असें म्हटलें आहे.

त्याचा मुलगा **जलौक** हा मोठा पराक्रमी व कर्तबगार राजा होता. त्यानें काश्मीराबाहेर कनोजपर्यंत पुष्कळ प्रांत काबीज केले. त्यानें प्रथमतः सप्तप्रधानांची योजना केली व त्यांचेकडे राज्यकारभाराचीं निरनिराळीं खातीं दिलीं. या सप्तप्रधानांच्या नांवांवरून त्यांचे अधिकार व कामें निश्चित होतात; न्यायाधीश, जमाखर्ची फडणीस, खजीनदार, सेनापति, परराष्ट्रीय वकील, धर्माधिकारी व फलज्योतिषी हे ते सात प्रधान होत.

यानंतर **हुष्क, जुष्क** व **कनिष्क** हे राजे जोडीनें काश्मीरवर अंमल चालवीत होते. यांचे कारकीर्दींत काश्मीरांत बुद्धधर्म जोरांत होता. याच काळांत **नागार्जुन** काश्मीरांत आला होता. या पुढील राजांच्या कारकीर्दींमध्यें काश्मीरांत पुन्हा हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन झालें. या राजांमध्यें **तिसरा गोनंद** मोठा पराक्रमी निघाला. त्यानें काश्मीरचें पूर्ववैभव परत आणलें. त्याला **कल्हणानें** रामायणांतील **रामाची** उपमा दिली आहे. नंतर पुन्हा काश्मीरावर परकी राजांचा अंमल झाला असें दिसतें. **मुकुल, हिरण्यकुल, मिहिरकुल** या राजत्रयीची हकीकत **कल्हणानें** दिली आहे. या काळांत राजांच्या दुर्वर्तनाचे पुष्कळ मासले **कल्हणानें** दिले आहेत. पुढें **गोपादित्य** म्हणून एक **गोनंद** राजघराण्यांतील राजा झाला. त्याच्या कारकीर्दीची **कल्हणानें** इतकी स्तुति केली आहे कीं

तेव्हां काश्मीरांत **सत्य युगाचा** अवतार झाला असें त्यानें म्हटलें आहे. येथपर्यंत **राजतरंगिणी**च्या पहिल्या तरंगांत हकीकत आली आहे.

दुसऱ्या तरंगामध्यें फक्त सहा राजांची कारकीर्द वर्णिली आहे. त्यांपैकीं **प्रतापादित्य (तुंजीन)** व जोडीनें राज्य करणारी त्याची राणी, आणि **जयेन्द्र** व त्याचा प्रख्यात मंत्री **संधीमति** यांच्या कारकीर्दी विशेष वाखाणण्यासारख्या होत्या असें दिसतें. **तुंजीन** व त्याची राणी यांचे कारकीर्दीमध्यें काश्मीरांत हिमवर्षावानें पीक पार बुडालें व सर्व देशभर मोठा दुष्काळ पडला. त्याप्रसंगीं राजाराणीनें आपला सर्व खजिना रिता करून प्रजेचे प्राण वांचविले. **जयेन्द्राची** कारकीर्दही मोठी वाखाणण्यासारखी होती. त्याला पुत्रसंतति नव्हती. म्हणून प्रजेनें **संधीमति** मंत्र्यालाच राज्यपद दिलें. तो शिवभक्त होता. त्यानें काश्मीरामध्यें शिवभक्तीचा प्रचार वाढविला व आपल्या राज्यांत विद्वान् लोकांना आश्रय देऊन त्यानें काश्मीरची कीर्ति जगभर केली. येथें दुसरा तरंग संपला.

**राजतरंगिणीच्या** तिसऱ्या तरंगांत **कल्हणानें** दहा राजांची हकीकत गोंविली आहे. त्यांपैकीं पहिला राजा **मेघवाहन** नांवाचा होता. हा **गोनंद** राजघराण्यांतील दूरचा नातेवाईक असून तो **गांधार** देशांत वाढलेला होता. हा राजा फार दयाळू होता. त्यानें राज्यांतील प्राणिहत्या बंद केली. त्यानें दोन यज्ञ केले. यानें **लंकेपर्यंत** स्वारी केली. **लंकेंत** त्याचा फार आदरसत्कार झाला. **मेघवाहनानंतर** त्याचा पुत्र **श्रेष्ठसेन** गादीवर आला. त्याला **हिरण्य** व **तोरमाण** असे दोन पुत्र होते. **हिरण्य** राजा झाला व **तोरमाण** त्याला राज्यकारभारांत मदत करीत असे. पण राजाची त्याच्यावर गैरमर्जी झाली व **तोरमाण** व त्याची पत्नी **अंजना** या दोघांना कैदेंत टाकण्यांत आलें. तेथें त्यांना एक मुलगा झाला; पण **अंजनानें** तो एका कुंभारिणीला संभाळण्याकरितां दिला. तेथें तो मोठा झाल्यावर त्याला आपल्या खऱ्या आईबापांची माहिती झाली व त्यानें त्यांना कैदेंतून सोडविलें. पण इतक्यांत **तोरमाण** वारला. इकडे **उज्जेन**च्या **विक्रमा-**

**दित्य** राजानें काश्मीरच्या राजाचा पराभव केला व तें राज्य **मातृगुप्त** नांवाच्या आपल्या आज्ञाधारक विद्याभक्ताला आज्ञापालनाचें पारितोषिक म्हणून दिलें. त्यानें फारच उत्तमपणें राज्य केलें. **तोरमाणा**चा पुत्र **प्रवरसेन** याला **मातृगुप्ताचे** अलौकिक गुण कळल्यामुळें त्यानें **मातृगुप्तास** पदच्युत केलें नाहीं. पण **विक्रमादित्याच्या** मृत्यूनंतर **मातृगुप्तानें** आपण होऊन राज्यत्याग केला व **प्रवरसेना**ला राज्य दिलें. पण **प्रवरसेन मातृगुप्ता**इतकाच उदार व सत्यवादी होता. तो **मातृगुप्ताच्या** हयातीपर्यंत राज्याचें उत्पन्न **मातृगुप्ताकडे** पाठवी व **मातृगुप्त** तें धन परोपकारांत खर्च करी. या दोन थोर व अलौकिक विभूतींमध्यें अधिक **उदारचरित** कोण हें ठरविणें कठिण आहे.

हा प्रवरसेन **दुसरा प्रवरसेन** म्हणून प्रख्यात आहे. त्यानें **उत्तर हिंदुस्थानावर** स्वारी करून तेथल्या राजांना आपल्या अंकित करून घेतलें. त्यानें **माळव्याच्या शिलादित्य प्रतापशील** राजाला त्याची **माळव्याची** गादी परत मिळवून दिली. काश्मीरांतील त्याचें महत्त्वाचें काम म्हणजे हल्लींच्या **श्रीनगर** राजधानीची स्थापना हें होय. त्यानें त्या शहराला **प्रवरपुर** असें नांव दिलें; पण या नव्या शहरासच **जुनें श्रीनगर** हें नांव मिळालें. **अशोक** राजानें वसविलेल्या श्रीनगराला **पुराणाधिष्ठान** ( अर्वाचीन ) **पन्द्रतन** हें नांव मिळालें.

या नव्या शहराचें **कल्हणा**नें " लाखों गगनचुंबी प्रासादांनीं व दुकानांनीं शोभायमान झालेलें व वसंतऋतूमध्यें असंख्य फुलांनीं सुगंधित झालेलें नगर " म्हणून कौतुकानें वर्णन केलें आहे व **वितस्ता (झेलम)** नदीवर नावांचा प्रशस्त पूल बांधण्यांत आला असें सांगितलें आहे.

**दुसऱ्या प्रवरसेनाचा** एक नातू **रणादित्य** नांवाचा मोठा विख्यात राजा होऊन गेला. या राजाच्या कपाळावर जन्मापासून शंखाची आकृति होती. याच्या राणीचें नांव **रणारंभा** हें होतें. ही दक्षिण हिंदुस्थानच्या **चोल** देशाच्या राजाला समुद्रकिनाऱ्यावर रत्नासारखी सांप-

डली. **रणादित्यानें** तिला मागणी घातली. **चोल** राजानें **रणादित्याचा** पराक्रम पाहून ती मागणी कबूल केली, व **रणादित्याचें रणारंभेशीं** थाटानें लग्न झालें. **रणादित्यानें** तिला आपली पट्टराणी केलें. **रणादित्यानें** पुष्कळ देवालयें बांधलीं व आजाऱ्यांकरितां रुग्णशाळा बांधल्या. या राजानें तीनशें वर्षें राज्य केलें व तो वारल्यावर पाताळलोकीं गेला.

**रणादित्याच्या** पश्चात् त्याचा वडील मुलगा **विक्रमादित्य** गादीवर आला. त्याची कारकीर्द चाळीस वर्षें चालली. हा राजा संततिहीन वारला म्हणून त्याचा धाकटा भाऊ **बालादित्य** गादीवर बसला.

**बालादित्य** हा **गोनंद** राजघराण्यांतला शेवटचा राजा होय म्हणून **कल्हणानें** या राजाची जास्त सविस्तर हकीकत दिली आहे असें दिसतें.

**बालादित्य** मोठा बलाढ्य राजा निघाला. त्यानें आपल्या सर्व शत्रूंना जिंकलें. तो शिवभक्त होता. **खग**, **शत्रुघ्न** व **मालव** नांवाचे तिघे बंधु त्याचे मंत्री होते.

या राजाला **अनंगलेखा** नांवाची एक मुलगी होती. ज्योतिषांनीं तिचे व राजाचे ग्रह पाहून असें भविष्य केलें कीं **बालादित्याचा** जांवई हा **काश्मीरचा** पुढचा राजा होईल, व **गोनंद** राजघराणें **बालादित्याच्या** मरणानंतर अस्तंगत होईल. भविष्य खोटें पाडण्याकरितां **बालादित्यानें अनंगलेखेचें** राजघराण्यांतील पुरुषाशीं लग्न न लावतां **दुर्लभवर्धन** नांवाच्या कायस्थ जातींतील एका सुंदर पुरुषाशीं तिचा विवाह लावून दिला. पण राजाला ठाऊक नव्हतें कीं **दुर्लभवर्धन** हा **कर्कोटक नाग** राजघराण्यांतील लेकावळा मुलगा होता. **दुर्लभवर्धन** हा मोठा बुद्धिवान असून त्याच्या सद्वर्तनामुळें तो सर्वांचा आवडता होता. बालादित्यानें त्याचें **प्रज्ञादित्य** असें अन्वर्थक नांव ठेविलें व त्याला पुष्कळ संपत्ति दिली. हलक्या कुळांतला म्हणून **अनंगलेखा** आपल्या नवऱ्याला तुच्छ लेखी. ती बापाच्या लाडामुळें व वाईट संगतीमुळें उच्छृं-

खल बनली. तिचें **खग** मंत्र्यावर प्रेम जडलें व त्या मंत्र्याशीं ती गुप्तपणें व्यभिचार करूं लागली. दुर्लभवर्धनाला आपल्या बायकोच्या वाईट चालीबद्दल संशय आला व त्यानें तिला आपल्या प्रियकराच्या गाढ आलिंगनांत निजलेली पाहिली. दुसरा तिसरा पुरुष असता तर त्यानें दोघांना तत्काल ठार केलें असतें. पण **दुर्लभवर्धन** हा फार विचारी व आत्मसंयमी असल्यामुळें त्यानें आपला राग आवरला व त्यानें **खग** मंत्र्याच्या कपड्यावर खालील मजकूर लिहिला.

" जरी तुला ठार मारलें पाहिजे होतें तरी मीं तुला जीवदान दिलें आहे; या गोष्टीचें तूं स्मरण ठेव. "

याप्रमाणें मजकूर लिहून **दुर्लभवर्धन** त्यांना न कळत तेथून निघून गेला. **खग** मंत्र्यानें उठल्यावर तो मजकूर वाचला व **दुर्लभवर्धनाच्या** उदार व निर्द्वेषी व निःस्पर्धी स्वभावानें त्याचें मन बदललें. त्याला आपल्या कृतकर्माचा पूर्ण पश्चात्ताप झाला व त्यानें आपल्या जीवदात्या **दुर्लभवर्धनाचा** उतराई होण्याचा निश्चय केला. तेव्हां **बालादित्याच्या** मरणानंतर **खग** मंत्र्यानें **दुर्लभवर्धनास** गादीवर बसविलें. याप्रमाणें **बालादित्या**बरोबर **गोनंद** राजघराण्याचा अंत झाला व **कर्कोटकनाग** राजघराण्याची काश्मीरच्या गादीवर स्थापना झाली. अशा तऱ्हेनें ज्योतिषांनीं केलेलें भविष्य खरें झालें. येथेंच **राजतरंगिणीचा** तिसरा तरंग संपतो व **काश्मीरच्या** दंतकथात्मक इतिहासपर्वाचीही समाप्ति होते.

---

# प्रकरण ७ वें

## काश्मीरांतील हिंदु कारकीर्द ( सन ५९९ ते १३३८ )

काश्मीरच्या या कालपर्वाच्या सुमारें साडेसातशें वर्षांमध्यें साठ सत्तर राजे होऊन गेले. त्यांची सविस्तर हकीकत **कल्हणानें राजतरंगिणीच्या** चार ते आठ तरंगांत दिली आहे व **कल्हणाच्या** नंतरच्या काळची हकीकत **जोनराज** कवीनें आपल्या **राजावली** या ग्रंथामध्यें दिली आहे. या सर्व राजांची क्रमवार हकीकत येथें देणें शक्य नाहीं व ती मनोरंजकही होणार नाहीं. कारण या कालांत पुष्कल राजे व्यसनी व विलासी निघाल्यामुळें त्यांच्या दुष्कृत्यांच्या वर्णनानेंच **राजतरंगिणीचीं** व **राजावलीचीं** पानें भरलेलीं आहेत. तेव्हां थोड्याशा पराक्रमी व कर्तबगार होऊन गेलेल्या राजांची संक्षिप्त हकीकत दिली म्हणजे पुरे आहे.

या कालपर्वांतील पहिला प्रख्यात राजा म्हणजे **ललितादित्य मुक्तापीड** हा होय. हा इसवीसन आठव्या शतकांत उदयास आला. **तारापीड** नांवाच्या व्यसनी अल्पवयी राजानंतर हा गादीवर बसला व ह्यानें छत्तीस वर्षें मोठ्या वैभवानें राज्य केलें. तो अत्यंत पराक्रमी होता. त्यानें हिंदुस्थानभर व **मध्य आशियाच्या** रेताड मुलुखभर धुडगूस घातला व पुष्कळ प्रांत आपल्या ताब्यांत आणले. उत्तर हिंदुस्थानांतील त्याची स्वारी टोळधाडीसारखी होती. तो आपल्या सैन्यासह **कान्यकुब्ज ( कनोज )** राजधानीवर इतक्या जलद चाल करून आला कीं तेथल्या **यशोवर्म** राजाला सैन्याची जुळवाजुळव करण्यास सवड सांपडली नाहीं. त्यामुळें त्याच्या सैन्याचा पुरा धुव्वा उडून त्याला **ललितादित्याशीं** अपमानास्पद तह करावा लागला. **ललितादित्यानें चीनच्या** राजाकडे वकील पाठविल्याचा उल्लेख चीनच्या इतिहासांत सांपडतो. परंतु **ललितादित्याची** कीर्ति त्याच्या स्वाऱ्यांपेक्षां त्याच्या शास्त्रकला-

दिकांना दिलेल्या उदार आश्रयामुळें, त्यानें बांधलेल्या प्रचंड प्रासादांमुळें व त्याच्या लोककल्याणकारी राज्यकारभारामुळें अजरामर झाली आहे.

त्यानें अर्वाचीन कालच्या **पंच** प्रांतांची राजधानी **पर्णोत्स** ही वसविली; तसेंच **ललितपुर** व **परिहासपुर** नांवाचीं शहरें वसविलीं. परिहासपुरामध्यें **ललितादित्यानें** मोठमोठीं देवालयें, चैत्य व विहार बांधले. त्यांचे अवशेष अजून दृष्टीस पडतात. परंतु **ललितादित्याचें** चिरस्मरणीय स्मारक म्हणजे **काश्मीर** प्रांताचा अद्वितीय अलंकार **मार्तंडाचें** ( सूर्याचें ) देवालय हा होय. या देवळाचें वर्णन मागें आलेंच आहे. तेव्हां त्याची येथें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. **ललितादित्यानें** काश्मीरांतील दुर्जल भागांत शेतीकरितां पाटाचें पाणी आणविलें.

**ललितादित्य** बौद्ध भिक्षु व हिंदु ब्राह्मण यांचा सारखाच परामर्ष घेत असे. जरी **ललितादित्य** हा मोठा जेता होता व न्यायानें राज्यकारभार करी तरी तो **शिकंदर** बादशाहाप्रमाणें मोठा मद्यपी होता. एकदां त्यानें मद्याच्या धुंदींत **श्रीनगरास** आग लावण्याचा मंत्र्यास हुकूम केला. मन्त्र्यांनीं गवताच्या गंजी पेटवून मद्यानें विचारमूढ झालेल्या राजाचें समाधान केलें. पण **ललितादित्याचा** चांगूलपणा हा कीं भानावर आल्यावर राजाला पश्चात्ताप वाटला व त्यानें दारूच्या धुंदींतील आपले हुकूम न पाळण्याबद्दल मन्त्र्यांना बजावलें.

**ललितादित्याचा** नातू **जयापीडविनयादित्य** यानें एकतीस वर्षें राज्य केलें. प्रथमतः कांहीं काळ त्यानें आपल्या आजाच्या पावलावर पाऊल टाकून राज्यकारभार केला. पण कारकीर्दीचे अखेरीस तो फार जुलमी व दुष्ट राजा बनला व म्हणून त्याचें अकालीं मरण ओढवलें.

**जयापीडा**नंतर दुर्बल राजे गादीवर असल्यामुळें सर्व राजसत्ता मन्त्र्याच्या हातीं गेली. त्या मंत्र्यांमध्यें **उत्पल** व त्याचे चार भाऊ हे प्रमुख होते. त्यांनीं लोकांना छळून स्वतःकरितां लुटालूट केली; त्यामुळें

राज्यांत अंदाधुंदी माजली. आपसांतल्या तंट्याबखेड्यांत चारी भाऊ मारले गेले व **उत्पल** हा जवळ जवळ राजाच बनला. **उत्पलाचा** मुलगा **सुखवर्मा** यानें आपलीही राजप्राय सत्ता ठाम बसविली. फक्त त्यानें राजा ही पदवी धारण केली नाहीं. पण **सुखवर्म्याचा** पुत्र **अवंतिवर्मा** यानें तीही गोष्ट घडवून आणली.

**अवंतिवर्मा** ( सन ८५५ ते ८८३ ) हा **काश्मीरच्या** राजमालिकेंतील एक देदीप्यमान मणि होय यांत शंका नाहीं. तो हलक्या कुळांतून सर्व सत्ताधीश राजकर्त्यांच्या ( King-makers ) पदवीला पोहोंचलेल्या सरदाराचा मुलगा होता. तो संकटमय प्रतिकूल-परिस्थितिरूपी शाळेंत शिकून तयार झालेला स्वयंकृत ( Self-made ) कर्तबगार पुरुष होता. त्याच्या अंगांत 'लोण्याचें' मार्दव व 'वज्रा'चें काठिण्य या गुणांचा दुर्मिळ मिलाफ झालेला होता; तो खरा **समाजसेवक** होता; आपल्या कारकीर्दीच्या प्रारंभीं त्याला आपल्या सामर्थ्यवान् चुलतभावांना वठणीवर आणून त्यांना गोगलगाय बनवावें लागलें. नंतर त्यानें राज्यकारभाराच्या सुधारणेकडे लक्ष पुरविलें. त्यानें प्रजेचा दंग्याधोप्यापासून व अंदाधुंदीपासून बचाव केला व तिला आपली सांपत्तिक स्थिति सुधारण्यास सुसंधि आणून दिली. म्हणून त्याचेबद्दल असे उद्गार काढण्यांत आले कीं **ललितादित्याच्या** लष्करी पराक्रमापेक्षां **अवंतिवर्म्याचे** शांततामय पराक्रम अधिक प्रशंसनीय आहेत. पण त्याचे कारकीर्दीमध्यें **डामर** नांवाच्या पुंड जातीपैकीं **धन्व** नांवाचा सरदार फार पुंडावा करूं लागला होता. सर्व जातीला दहशत बसावी म्हणून **धन्वाला** चौकशीखेरीज ठार मारण्यांत आलें. यायोगें **डामर** जाताच्या लोकांचा पुंडावा अजिबात बंद झाला. काश्मीरच्या **सुराज्यव्यवस्थेमध्यें अवंतिवर्मा** राजाला त्याच्या **सूर** नांवाच्या मुख्य मंत्र्याची मोठी मदत मिळत असे. या दोघांचा एकमेकांवर फार विश्वास असे. तसेंच त्यांचे मनांत परस्परांविषयीं अतिशय आदरबुद्धि वसत असे. अशी विलक्षण सेव्यसेवकाची जोडी विरळाच खरी !

काश्मीर खोऱ्याचें विलक्षण वैगुण्य म्हणजे पाण्याचा वाजवीपेक्षां फाजील पुरवठा व नदीनाल्यांना अतिवृष्टीमुळें येणाऱ्या पुराची धास्ती. अशा परिस्थितीमुळें काश्मीर खोरें हें ओल्या दुष्काळाचें माहेरघर बनलें होतें. म्हणून **अवंतिवर्म्यानें सूय** नांवाच्या निष्णात एंजिनियराची या कामावर नेमणूक केली. **सूयानें बारामुळा** येथें सांचलेला गाळ काढून टाकून नदीच्या पाण्याला व पुराला मोकळा मार्ग करून दिला व त्यायोगें काश्मीर खोऱ्यांतील फाजील पाणी वाहून जाऊन जमिनीची ओल कमी होऊन ती सुपीक व विपुल धान्यदायी बनली.

ज्याप्रमाणें खोलगट व पाणथळ जमिनींतील ओल काढून टाकून ती जमीन त्यानें सुफलदायी केली, त्याप्रमाणें **केरवा** नांवाच्या पठारांतील कोरड्या जमिनींना पाटाच्या पाण्याचा पुरेसा पुरवठा करून त्या केरवा जमिनी विपुल पीक देणाऱ्या केल्या. **अवंतिवर्म्यानें अवंतिपुर** शहर बसवून तेथें **अवंतिश्वर** नांवाचें प्रचंड व प्रेक्षणीय देवालय बांधलें. त्या देवालयाचे अवशेषसुद्धां आश्चर्यानें मन थक्क करणारे आहेत हें मागें दृश्य दर्शनाच्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. ज्याप्रमाणें कृषिकर्म व ललित-कला यांची **अवंतिवर्म्यानें** प्रगति केली, त्याप्रमाणें विद्या व शास्त्रें यांना व त्यांच्या भक्तांना त्यानें उदार आश्रय दिला. **अवंतिवर्म्याची** एक पिढीची कारकीर्द चिरस्मरणीय झाली यांत शंका नाहीं.

**अवंतिवर्म्याचे** पश्चात् **शंकरवर्मा** ( सन ८८३ ते ९०२) हा गादी-वर आला. पण त्यानें लोकांवर अनन्वित कर बसविले व आपली काय-मची अपकीर्ति करून घेतली. त्याचे पश्चात् अवघ्या चवतीस वर्षांत दहा राजे गादीवर येऊन गेले; या राजांच्या कारकीर्दींमध्यें **तंत्री** नांवाचे लष्करी पेशाचे लोक प्रबल झाले. **रोमन** बादशाहांच्या शरीर-संरक्षकांप्रमाणें ( Prætorian guards of Rome ) हे लोक आपल्या लष्करी सामर्थ्याचा स्वतःच्या फायद्याकरितां दुरुपयोग करूं लागले व त्यामुळें राज्यांत बजबजपुरी माजली. गादी मिळविण्याकरितां बिन-

दिक्कत हवें तें मोल देण्यांत येऊं लागलें; राज्याकरितां हपापलेले राजवंशीय पुरुष पाण्यासारखा पैसा उधळूं लागले; राजवंशीय स्त्रिया आपलें कौमार्य विकूं लागल्या; पुत्र पित्याविरुद्ध कट करूं लागला; बाप आपल्या अपत्यांना मारेकरी घालूं लागला; गादीच्या घातक लाभाकरितां सर्वांनीं आपली सत्यनिष्ठा व आपली उच्च पदवी पार झुगारून दिली. शेवटीं पदच्युत **चक्रवर्मा** राजानें **डामर** जातीच्या लोकांची मदत मागितली व त्यांच्या सामर्थ्याच्या साहाय्यानें त्यानें **तंत्री** लोकांचा पूर्ण पाडाव केला. पण **चक्रवर्म्याची** आगींतून निघून फोपाट्यांत पडल्याप्रमाणें गत झाली. आतां काश्मीर देशांत **डामर** लोक प्रबल झाले व त्यांनीं राजसत्ता एका बाजूस सारून लोकांना लुटण्याचा सपाटा सुरू केला. देशामधील **सरकार** ही संस्थाच नामशेष झाल्यासारखी झाली व जिकडे तिकडे बेबंदशाही माजली. काश्मीर देश दोन शतकेंपर्यंत खून, गळेदा बी, विषप्रयोग यांचें माहेरघर बनला; व हलकट, दुर्व्यसनी, लाचखाऊ लोक सत्ताधारी अधिकारी झाले. या बेबंदशाही राज्यकारभाराचा कळस म्हणजे **हर्ष** राजाची ( १०८९ ते ११०१ ) कारकीर्द होय. या राजानें तर राजघराण्यांतील मंडळींवर व खानदानीच्या सरदार मंडळीवर मारेकरी घातले; तदनुरूप किती तरी लोक ठार मारले गेले. या अनन्वित अत्याचारानें काश्मीरी प्रजेच्या सहनशीलतेचा अंत पाहिला. जेव्हां **हर्षाच्या उच्छल** व **सुस्सल** नांवांच्या पुतण्यांनीं बंडाचें निशाण उभारलें तेव्हां रावापासून रंकापर्यंत व शिपायीपेशाच्या माणसापासून तों याज्ञिक पेशाच्या माणसापर्यंत सर्व प्रजा बंडाच्या निशाणाखालीं जमली. राजवाड्याला आग लावण्यांत आली; त्यांत राणी भाजून मेली; युवराजाला ठार करण्यांत आलें; राजा एका गलिच्छ झोपड्यांत लपून बसला; पण त्याला हुडकून काढून त्याचा निर्दयपणें जीव घेण्यांत आला. याप्रमाणें **हर्षाचें** घराणें अस्तंगत झालें.

बंडवाल्या पुतण्यांपैकीं वडील पुतण्या **उच्छल** (सन ११०१ ते ११११) हा गादीवर बसला. त्यानें प्रथमतः पुंड सरदारांना निःशस्त्र केलें. त्यानें राज्यकारभार आपल्या स्वतःचे हातीं घेऊन अंमलदारावर वचक बसविला. त्यानें राज्यकारभारांतील लांडीलबाडी व लांचलुचपत यांचा नायनाट केला व आपल्या प्रजेचे गुणावगुण ध्यानांत धरून अपूर्व निस्पृहतेनें न्यायदानाचें काम केलें. तो प्रजेचीं गाऱ्हाणीं लक्षपूर्वक ऐकून घेत असे व शक्य तितक्या तऱ्हेनें तो तीं गाऱ्हाणीं दूर करी. **बगदादच्या हरून आल रशीद** खलीफाप्रमाणें तो लोकांमधील असंतोष व लोकांची दुःखद स्थिति कळण्याकरितां वेष पालटून देशांत हिंडत असे. शहरांतील दुष्काळग्रस्त लोकांना तो खजिन्यांतील धान्य स्वस्त दरानें विकीत असे. बंडाचा वणवा पेटण्यापूर्वींच तो त्याचा बींमोड करी. याप्रमाणें **उच्छलानें** उत्तम तऱ्हेनें राज्यकारभार केला व प्रजेला सुख दिलें. पण तो फार गर्विष्ट होता. म्हणून त्याचे नोकर चाकर त्यावर नाराज असत. म्हणून त्यांच्या हस्तें तो अकालीं मारला गेला.

**उच्छलाच्या** मागून त्याचा भाऊ **सुस्सल** (सन १११२ ते ११२८) गादीवर आला. त्यानें आपल्या भावाला मारणाऱ्याचा भयंकर सूड घेतला. त्यानें सन ११२० पर्यंत बिनबोभाट व उत्तम तऱ्हेनें राज्यकारभार हांकला. पण स. ११२० मध्यें **हर्ष** राजाच्या **भिक्षाचार** नांवाच्या नातवानें **सुस्सला**ला गादीवरून हुसकवून लावलें; पण सुस्सलानें ११२१ मध्यें गादी परत मिळविली. सन ११२८ पर्यंत त्यानें राज्य केलें. कारकीर्दीच्या अखेरीस त्यानें जुलमाचीं व क्रूरतेचीं कृत्यें केलीं. त्याचें प्रायश्चित्त त्याला ( अकालीं ) मरणानें मिळालें.

**सुस्सलाचा** वडील मुलगा **जयसिंह** ( ११२८ ते ११५५ ) हा **काश्मीरच्या** गादीवर बसला. हाच राजा **कल्हण कवीचा** आश्रयदाता होता. **जयसिंह** हा काश्मीरच्या इतिहासांतील एक विलक्षण पुरुष होऊन गेला: जरी त्याचे अंगीं धैर्य, शौर्य हे गुण होते तरी तो आपले हेतु साम दाम दंड भेद या राजनीतितत्त्वांच्या साधनांनीं सिद्धीस नेत असे.

आपले हेतु शुद्ध असल्यावर त्याला कोणतेंही बरें बुरें साधन उपयोगांत आणण्यास दिक्कत वाटत नसे.

राजसंनिध जाणाराशीं **जयसिंह** सभ्यतेनें वागे; नोकरांशीं व प्रजेशीं तो सुविचारपूर्वक वागे; शत्रूंची नांगी मोडल्यावर तो त्यांच्याशीं उदारपणानें वागे; आपल्या योजनांच्या सिद्ध्यर्थ तो लागतील ते उपाय करण्यास कचरत नसे; त्याचा चेहरा सदा हसरा व शांत दिसे; पण त्याच्या अन्तःकरणांत गूढ गुह्य लपलेलें असे. प्रथमतः तो गादीवर आला तेव्हां त्याचें स्थान स्थिर नव्हतें. पण त्यानें कालेंकरून आपल्या सर्व शत्रूंवर विजय मिळविला व आपल्या अमदानींत त्यानें प्रजेला शांततेचा व संपन्नतेचा लाभ करून दिला. पण या सर्व गोष्टी सर्वस्वी **जयसिंहाच्या** अंगच्या गुणांनीं-त्याचा अपूर्व प्रसंगावधानीपणा, व संकटसमयींचा त्याचा उपाययोजकपणा ह्यांनीं घडून आल्या यांत संशय नाहीं. **कल्हणानें जयसिंहाच्या** स्वभावाचें व चारित्र्याचें खालील श्लोकांत मार्मिक वर्णन केलें आहे.

प्राप्तप्रसङ्गात्तदिदं गुणग्रामोपवर्णनम् ।
वक्ष्यमाणं सुबहुशोप्यत्र लेशात्प्रदर्श्यते ॥

पूर्वापरानुसंधानवन्ध्यैर्दृष्टान्तवत्कथाः ।
नाबुद्ध्वातिगभीराणां शक्या रसयितुं गुणाः ॥
प्रत्यक्षस्य गुणान्राज्ञो विचिन्वन्तो यथास्थितान् ।
अनीर्ष्यस्य भविष्यामो विवेकस्यानृणा वयम् ॥

स्थितस्य तत्त्वविज्ञाने नान्यस्य हि पटुर्जनः।
अमानुषानुभावस्य राज्ञः किंपुनरीदृशः ॥

हितानां दाराणां सदृशसुखदुःखस्य सुहृदः
कवेस्सोल्लेखस्य प्रियसकललोकस्य नृपतेः ।
स्थितानां कोप्यत्र व्यवहितविवेकः स्वकुकृते-
रसामान्यं ज्ञातुं सुभगमनुभावं न कुशलः ॥

भवेत्प्रातिप्रसरणा परिणामथ वा मतिः ।
कथं सर्वस्याद्भुतायां निष्ठायां गुणदोषयोः ॥

सन्त्येवास्यापि विषमाः स्वभावा दोषतां जनः ।
येषां विपाकभव्यत्वमजानन्गणयत्ययम् ॥

विकासः केषांचिन्नयनविषमैर्विद्युदुदयैः
परेषामुद्धूतिः श्रवणकटुभिर्दीर्घरसितैः ।
नचेष्टा काप्यन्योपकृतिपरिहीना जलमुचो
जडो वर्षादन्यं गणयति गुणं नास्य तु जनः ॥

गुणांल्लोकोत्तराञ्शृण्वन्नस्यानुभवगोचरान् ।
भविता पूर्वभूपालकृत्ये सप्रत्ययो जनः ॥

अनुच्चलच्चापिस्थानाद्भ्रूभंगेन चकार सः ।
विलोलांल्लोमकम्पेन दिङ्नाग इव भूधरान् ॥

विरुद्धग्राहिनी वृन्दा गूढं यद्भयसंभ्रमम् ।
वहन्ति तापं भूपाला और्वाग्निमिव सिन्धवः ॥

भूमिभृद्भास्वतस्तस्य तेजसाप्याथितो गतः ।
पूर्वराजयशश्चन्द्रो भुवनेष्वप्रकाशताम् ॥

योयस्तं पश्यति स्वात्मसंमुखं स स सर्वतः ।
जानात्यवक्रोल्लिखितं देवाबिम्बमिवेश्वरम् ॥

स्थिरप्रसादो दत्ते यत्तदादत्ते न स क्वचित् ।
भयं पुनः प्रणमतां दत्तं हरति विद्विषाम् ॥

कृपासेः प्रतिबिम्बं स्वं हित्वा नान्योस्य संमुखः ।
नापरः प्रतिशब्दाच्च गर्जतः प्रतिगर्जति ॥

तस्य नातिशितं कोपे प्रसादे निशितं पुनः ।
धत्ते तीक्ष्णैकधारस्य तरवारेस्तुलां वचः ॥

तस्याकुजन्मनो नित्याम्लानलक्ष्मीविकासिनः ।
प्रभवन्त्याश्रिताः कल्पशाखिनः पल्लवा इव ॥

राज्ञि गाम्भीर्यदुर्लक्ष्यमहात्म्यप्रभविष्णुताम् ।
विवेद मन्त्रिणां लोकः सिषेवेतांश्च सर्वतः ॥

"या प्रसंगानुसार त्याच्या अनेक गुणांचें वर्णन पुढें अनेक वेळां जरी तें केलें जाणार आहे तरी संक्षेपानें येथें देत आहें. ज्यांनीं पूर्वापार ( संबंध ) लक्षांत आणिला नाहीं व ज्यांना दृष्टान्तादाखल दिलेल्या गोष्टींची पूर्ण माहिती नाहीं अशांना अतिगंभीर स्वभावांच्या लोकांच्या गुणांची पारख बरोबर होणार नाहीं. आपल्या प्रत्यक्ष अवलोकनांत असलेल्या राजांच्या गुणांचें यथावत् वर्णन आपण केल्यास ईर्ष्यापराङ्मुख ( पक्षपातरहित ) निर्णय देणें आपणांस शक्य होईल. कोणत्याही सामान्य माणसाचा यथास्थित स्वभाव समजणें कोणासही शक्य नाहीं; मग अमानुष शक्ति असलेल्या अशा या राजासंबंधीं काय बोलावें? स्वतःच्या दुष्कृतीनें ज्याचा विवेक नाहींसा झाला आहे अशा माणसास साध्वी स्त्रियांचें, समदुःखसुख अशा सुहृदांचें, उज्वल कवींचें, व सर्व लोकांना प्रिय असलेल्या नृपतींचें असामान्य व सुभग चारित्र्य कळणार नाहीं. तेव्हां गुणदोषविवेचनाच्या अद्भुत कार्यांत वाटेल त्या माणसास स्वतःची बुद्धि चालवून कसें यश संपादन करितां येईल? ह्या राजाचे स्वभावांतही विषम गुणांचें अस्तित्व आहे; परंतु त्यांचे मोठे परिणाम लक्षांत न घेतां लोकांनीं त्यांस दोषाचे कोटींत घातलें आहे. मेघाची प्रत्येक कृति परोपकारक आहे; कांहीं ( लता ) दृष्टीला दिपविणाऱ्या विद्युदुन्मेषानें विकसित होतात; कांहीं ( लता ) श्रुतिकटु अशा दीर्घ गर्जनांनीं उगवतात; परंतु बुद्धिविहीन माणसास वृष्टि करण्यापलीकडे मेघांत दुसरा कोणचाच गुण दिसत नाहीं. याचे प्रत्यक्ष अनुभवास येणारे लोकोत्तर गुण ऐकिले असतांना पूर्वींच्या राजांच्या कृतीवर लोकांचा विश्वास बसेल. ज्याप्रमाणें दिग्गज स्वतःचें स्थान न सोडतां केवळ लाम-कम्पानें पर्वतांना हादरून सोडतो, त्याप्रमाणें हाही केवळ भ्रूभङ्गानें इतर राजांना भयकम्पित करी. ज्याप्रमाणें समुद्र आपल्या उदरांत वडवानल धारण करितात व त्यांना मिळणाऱ्या नद्या मोठ्यानें आक्राश करितात,

त्याप्रमाणें याच्या भयानें राजे लोकांचे हृदयांत गूढ रीतीनें तापाचें वास्तव्य होई, व त्यांचा सेनासमूह मोठ्यानें आक्रोश करी. हा नृपतिसूर्य आपल्या तेजानें देदीप्यमान झाला, व त्यामुळें पूर्वनृपतींचा यशश्चंद्र पृथ्वीवर विलुप्त होऊन गेला. जो जो त्याकडे पाही त्यास तो स्वसंमुख वाटे; ज्याप्रमाणें शंकराची रेखीव कोरलेली मूर्ति चोहोंकडून पहाणाऱ्यास ती स्वतःकडे पहात आहे असें वाटतें. ह्याचा प्रसाद स्थिर असून एकदां दिलेलें हा कधींही परत घेत नाहीं; मात्र शरण आलेल्या शत्रूंना दिलेलें भय हा परत घेई. एकदां तरवार उपसली म्हणजे स्वतःचे प्रतिबिम्बाखेरीज दुसरें कोणीही याचेपुढें जात नसे; व एकदां गर्जूं लागला म्हणजे याचे प्रतिशब्दाशिवाय दुसरें कोणीही प्रतिगर्जना करीत नसे. त्याचे शब्द एकच तीक्ष्ण धार असणाऱ्या तरवारीप्रमाणें असत; रागांत ते अत्यंत तीक्ष्ण नसत व प्रसन्न झाला असतां ते परिणामकारक होत. उच्च कुलांत जन्मलेल्या व सदैव लक्ष्मीचा विकास करणाऱ्या या राजाचे आश्रित, पृथ्वीवर न वाढणाऱ्या व सदैव सौंदर्यवृद्धि करणाऱ्या कल्पतरूच्या पल्लवाप्रमाणें प्रभाववान् होत. गाम्भीर्यामुळें कळण्यास कठिण झालेल्या त्याच्या मोठेपणाची शक्ति त्याचे मन्त्र्यास अवगत होती; व तोही सर्वप्रसंगीं त्यांचा योग्य परामर्ष घेत असे."

**जयसिंहाचे** पश्चात् काश्मिर देशांत पुन्हा बेबंदशाही सुरू झाली, व ती दोन शतकें चालली. शेवटीं **सुहदेव** राजाच्या ( सन १३०१ ते १३२० ) कारकीर्दीमध्यें काश्मीर देशावर मुसलमानी लोकांची टोळधाड आली. **कंदाहारच्या** नबाबाचा सेनापति **झुलकदारखान** यानें काश्मीर खोऱ्यांत प्रवेश केला. **सुहदेवानें** सेनापतीला लांच देऊन ती स्वारी परतवली खरी. पण सेनापतीनें प्रांतामध्यें लुटालूट व जाळपोळ सुरूं केली. त्यावेळीं काश्मीर प्रांतांवर दैवाची मेहेर नज़र झाली व **झुलकदारखानाचें** सैन्य बर्फामध्यें गडप झालें.

इकडे **तिबेटचा रिंचन** नांवाचा एक राजकुमार काश्मीरवर हल्ला करण्यास बसला होता. **रामचंद्र** नांवाच्या काश्मीरी सरदारानें त्या हल्ल्याला

तोंड दिलें. पण **रिंचनानें रामचन्द्राच्या** सैन्यांत फितुरी पसरवून **रामचन्द्राचा** जीव घेवविला; व त्याच्या **कोटा** नांवाच्या बायकोशीं जबरीनें लग्न लाविलें. नंतर त्यानें दुर्बल **सुहदेवालाही** ठार केलें व आपण काश्मीरच्या गादीवर बसला. त्याची इच्छा हिंदू धर्मांत येण्याची होती. पण ब्राह्मणांच्या संकुचित धर्मवेडामुळें ती गोष्ट साध्य झाली नाहीं. म्हणून त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारला व **कोटापासून** झालेल्या आपल्या **हैदर** नांवाच्या अर्भक मुलाला **शहामीर** नांवाच्या मुसलमानाच्या हवालीं केलें. हा **शहामीर** सन १३१३ मध्यें **सुहदेवाच्या** चाकरीस राहिला होता. पण गादीवर आल्यापासून तीन वर्षांचे आंतच **रिंचन** वारला. **शहामीरानें रिंचनाच्या हैदरास** गादीवर न बसवितां जुन्या हिंदु राजघराण्यांतील **उद्यानदेव** नांवाच्या राजकुमारास गादीवर बसविलें. **उद्यानदेवानें कोटाशीं** पुनर्विवाह केला व तिच्यापासून त्याला एक मुलगा झाला. **शहामीरनें** आपली सत्ता व सामर्थ्य हळूहळू वाढविलें व **उद्यानदेवाला** व **कोटाला** प्रतिबंधांत ठेविल सन १३३८ मध्यें **उद्यानदेव** वारला. मग **शहामीरच** खरा राजा बनला. **कोटा** राणीनें राज्याची द्वाही फिरविली. पण **शहामीरानें** सर्व मुलूख आपल्या अंगाखालीं घातला व राजधानीचा ताबा घेतला. **कोटा** राणीवर हल्ला करून तिला बंदिवान केलें व तिजकडून जबरीनें लग्नाचें वचन घेतलें. नाइलाजानें ती त्या गोष्टीस कबूल झाली; पण लग्न झाल्याबरोबर तिनें आत्महत्या केली. याप्रमाणें सन १३३८ मध्यें काश्मीरांतील हिंदु राजवटीचा अंत होऊन मुसलमानी कारकीर्द सुरू झाली. त्या कारकीर्दीची हकीकत पुढील प्रकरणांत देणें प्राप्त आहे.

---

# प्रकरण ८ वें

## काश्मीरांतील मुसलमानी कारकीर्द (सन १३३८ ते १८१९)

**शहामीरानें** (सन १३३८ ते १३५५) गादी बळकावल्यावर सुलतान **शमसुद्दिन** असें नांव धारण केलें. प्रथमत. प्रजेची राजनिष्ठा संपादन करण्याकरितां त्यानें तिचेवरील जबर कर कमी केले. त्यानें जमिनीवरील सारा एकंदर उत्पन्नाचा एक षष्ठांश ठरविला. या काळांत प्रजेपैकीं पुष्कळांनीं मुसलमानी धर्म स्वीकारला. तरी पण जुन्या चालत आलेल्या चाली, जुन्या रीतिभाती व वेडगळ समजुती यामध्यें विशेषसा फरक झाला नाहीं व जुनीं यात्रास्थानें पवित्र गणलीं गेलीं. मात्र तेथें हिंदु देवांच्या मूर्तींऐवजीं मुसलमानी पीर आले.

शहामीरचे पश्चात् **शहाबुद्दिन** (सन १३५५ ते १३७४) गादीवर आला. त्यानें हिंदुस्थानच्या वायव्य प्रांतांवर स्वारी केली व **गझनी** व **कंदाहार** शहरांना काबीज करण्याची धास्ती घातली. पण अतोनात बर्फ पडल्यामुळें त्याला परतावें लागलें. सन १३६१ मध्यें काश्मीर खोऱ्यांमध्यें महापूर येऊन प्रजेची फार नासाडी झाली. काश्मीरचे पहिले पहिले मुसलमानी सुलतान धर्मसहिष्णु होते. उ. शहाबुद्दिनच्या **उदयश्री** नांवाच्या मंत्र्यानें बृहद्‌बुद्धाची धातूची मूर्ति वितळवून नाणीं पाडण्याची **शहाबुद्दिनाला** सल्ला दिली. पण ती सुलतानानें निखालस नाकारली. **शहाबुद्दिनाचे** शेवटचे दिवस सुखानें गेले नाहींत. आपल्या **लासा** नांवाच्या वेश्येच्या नादानें त्यानें आपल्या लेकावळ्या तीन मुलांना वाड्यांतून हाकलून लावलें. मरण सन्निध आलें म्हणून त्यानें आपल्या **हसन** नांवाच्या थोरल्या मुलाला शेवटीं आपल्याकडे आणलें खरें, पण पुन्हा त्याची व **हसनची** भेट झाली नाहीं.

औरस संततीचे अभावीं **शहाबुद्दिनचे** पश्चात् त्याचा भाऊ **कुतबुद्दिन** ( सन १३७४ ते १३९० ) गादीवर आला. मुसलमानी अमदानींत ' हजीर तो वजीर ' हा न्याय असे. यानें न्यायानें व सद्यतेनें राज्य केलें. त्याचेनंतर त्याचा थोरला मुलगा **शिकंदर** बुटशिकन ( सन १३९० ते १४१४ ) हा गादीवर आला. याच्या कारकीर्दीमध्यें मुसलमानीधर्म असहिष्णु बनला. त्याच्या पूर्वींचे सुलतान हिंदु प्रजेच्याकरितां गरज पडल्यास मुसलमानी कडव्या धर्मतत्त्वास मुरड घालण्यास कचरत नसत. **कुतुबुद्दिनानें** भावी दुष्काळनिवारणार्थ हिंदु धर्मान्वयें यज्ञ केला व ब्राह्मणांना जमिनी इनाम दिल्या. एका हिंदु साधूच्या प्रसादानें **शिकंदर** हा मुलगा आपल्याला झाला असा **कुतुबुद्दिनाचा** भाव होता. **शिकंदराचें** लग्न एका हिंदु कुमारिकेशीं झालें होतें व आपल्या कारकीर्दीच्या प्रारंभीं तो आपल्या पूर्वजांच्या पावलावर पाऊल टाकून राज्यकारभार चालवीत होता. परंतु त्यानें मोठ्या उदारतेनें ज्या परदेशच्या मुसलमान मौलवींना आश्रय दिला ते फार कडवे धर्मवेडे होते. त्यांना हिंदु व मुसलमान यांचेमधील सलोखा असह्य झाला. या परदेशी मौलवीमध्यें **मीरसय्यद महमद हमदानी** हा प्रमुख होता. त्यानें तरुण **शिकंदराला** पूर्णपणें भारून टाकलें. त्यानें आपली शिकस्त केली पण **शिकंदरानें** पुष्कळ काळपर्यंत हिंदूंचा छळ केला नाहीं. हिंदूचा बाटून झालेला **सुहभट्ट** नांवाचा मुसलमान मन्त्री यानें मूळच्या मुसलमान मौलवीच्या वरताण केली व **शिकंदर** सुलतान शेवटीं या बाटग्या मन्त्र्याच्या असहिष्णु सल्ल्यानें वागूं लागला. मग मात्र हिंदूंचा अनन्वित छळ झाला. हिंदूंची प्रेतें जाळण्याची चाल जबरीनें बंद करण्यांत आली; हिंदूंना आपआपल्या जातिनिदर्शक चिन्हांचें प्रदर्शन करण्याची बंदी करण्यांत आली. अखेरीस हिंदु धर्मीयांना देशांत राहण्याची मनाई करण्यांत आली; जेव्हां हिंदु लोक देश सोडून देशांतरीं जाऊं लागले तेव्हां देशाच्या सरहद्दीवरील सर्व वाटा बंद करण्यांत आल्या; व त्यांना **मरण** किंवा **धर्मांतर** या कैचींत धर-

ण्यांत आलें. पुष्कळांनीं आलेल्या प्रसंगाला पाठ देऊन धर्मांतर केलें; पण थोड्या महात्म्यांनीं मरण पतकरून अजरामर कीर्ति केली. काश्मीरांतील कितीतरी देवालयें व देवाच्या मूर्ति छिन्नविछिन्न करण्यांत आल्या. असो.

**शिकंदरानें** हिंदुस्थानच्या वायव्य प्रांतावर स्वारी केली व **ओहिंद** शहर काबीज केलें व तेथल्या संस्थानिकाच्या **फिरोज** नांवाच्या मुलीशीं लग्न केलें. या राणीपासूनच शिकंदराला प्रख्यात **झेन-उल अबिदिन** नांवाचा मुलगा झाला.

**झेनउल अबिदिन** ( सन १४२१ ते १४७२ ) हा सतरा वर्षांचा असतांना आपल्या दुर्बल व अल्पवयी भावाच्या मरणानंतर गादीवर बसला. आपल्या बापाच्या व भावाच्या कारकीर्दीमध्यें जो हिंदु लोकांचा छळ झाला त्याचें परिमार्जन करून हिंदूंच्या हृदयावर झालेल्या मानसिक जखमा भरून काढण्याचा त्यानें निश्चय केला व तदनुरूप त्यानें राज्यकारभारांत सार्वत्रिक सुधारणा केली. प्रथमतः त्यानें कारभारांतील लांचलुचपत व लांडीलबाडी यांचा बीमोड केला. **सिर्यभट्ट** नांवाच्या उदार व विद्वान हिंदूला मुख्य न्यायाधीश व कोशाधीश नेमिलें व हिंदु प्रजेच्या दुर्दशेचें निवारण करण्याबद्दल **सिर्यभट्टाला** हुकूम केला. त्यानें हें काम अत्यंत कळकळीनें केलें. हिंदुधर्माच्या ग्रंथांचा विध्वंस बंद केला गेला. देशांतराला गेलेल्या ब्राह्मणांना परत बोलावून त्यांची शेतवाडी व मालमत्ता त्यांना देण्यांत आली. हिंदूंवरील डोईपट्टी प्रथम कमी व मग अजिबात बंद करण्यांत आली. हिंदु यज्ञयागादिक क्रिया व यात्रा यांना मुभा देण्यांत आली. प्रेतें जाळण्याची परवानगी देण्यांत आली. हिंदु मुलांकरितां शाळा उघडून तेथें त्यांना आपल्या धर्मग्रंथांचा अभ्यास करण्याची सवड दिली गेली. याप्रमाणें **झेनउल अबिदिनानें** आपल्या हिंदू प्रजेचा दुवा मिळविला.

**झेन-उल-अबिदिनानें** गुन्ह्याच्या बाबतींत रानटी व फाजील कडक शिक्षा कमी केल्या. त्यानें पुष्कळ गुन्ह्यांची फांशीची शिक्षा तुरुंगवासा-

वर आणिली, व तुरुंगामध्यें धंदेशिक्षण सुरू केलें; तसेंच कैद्यांकडून सार्वजनिक उपयोगाचीं कामें करून घेण्याची पद्धति पाडली. त्यानें प्रत्येक खेड्यांतील लोकांवर चोरी शोधून देण्याची अगर मालकाला मालाचा मोबदला देण्याची जबाबदारी टाकण्याचा क्रम सुरू केला. त्यामुळें चोरांच्या गुन्ह्याला पुष्कळ आला बसला. त्यानें विक्रीच्या दस्त-ऐवजावर राजाचें शिक्का-मोर्तब करण्याची व्यवस्था केली. त्या योगें खोट्या दस्तऐवजांना आळा बसला. त्यानें प्रवाशांकरितां वाटोवाट विश्राम घरें बांधलीं.

**झेन–उल–अबिदिनानें** आपल्या कारभारांत सर्व धर्मांच्या लोकांची भरती केली. उ. त्याच्या वरच्या दर्जाच्या अंमलदारामध्यें बौद्ध, हिंदु व मुसलमान या तिन्ही धर्मांचे लोक होते. त्यानें संस्कृत व परशीयन अशा दोन्ही भाषांना व भाषाकोविदांना आश्रय दिला. त्यानें पुष्कळ संस्कृत ग्रंथांचें परशीयन भाषेंत भाषांतर करविलें. काश्मिरी भाषेंतील वाङ्मयाला त्यानें उत्तेजन दिलें. त्याला स्वतःला संस्कृत भाषा अवगत होती. संस्कृत वाङ्मय ग्रंथ वाचण्याचा त्याला नाद होता. संस्कृतांतील **योगवासिष्ठ** हा तात्त्विक ग्रंथ तर त्याचा आवडता होता व त्याच्या उतार वयांत **योगवासिष्ठांतील** तत्त्वज्ञानाचा त्याच्या मनावर फार पगडा बसला. त्याच्या संकटमय व दुःखमय उतारवयांत तत्त्वचिंतन हेंच एक त्याच्या सुखासमाधानाचें साधन होतें. **झेन–उल–अबिदिनाची** कारकीर्द काश्मीरी–संस्कृत वाङ्मयवृद्धीचें विख्यात युग होतें यांत संशय नाहीं.

पण **झेन–उल–अबिदिनाचें** केवळ धर्माकडे व वाङ्मयाकडे लक्ष होतें असें नाहीं. प्रजेची सांपत्तिक स्थिति सुधारण्याकडेही त्यानें लक्ष पुरविलें होतें. त्यानें आपल्या राज्यांत तांबें व सोनें यांच्या खाणी शोधून त्या धातू तयार करण्याचे कारखाने काढले; तसेंच त्यानें कोरडवाहू पठार जमिनींना पाटाचें पाणी पुरवून त्या जमिनी लागवडीस आणल्या. त्यानें शेतकीप्रमाणें उद्योगधंद्यास उत्तेजन दिलें. कारण त्यानें शाली,

कागद, गालीचे व रेशमी कापड वगैरे उपयुक्त पदार्थ करण्याचे कारखाने काढले. एकंदर **झेन-उल-अबिदिन** हा काश्मीरचा **अकबर बादशाह** होता असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. परंतु या बादशाहाचे शेवटचे दिवस सुखांत गेले नाहींत. त्याचे मुलगे चांगले निघाले नाहींत. त्यांच्यामध्यें सारखे तंटे बखेडे चालत व शेवटीं ते एकमेकांशीं लढण्यापर्यंत पाळी आली. तेव्हां **झेन-उल-आबिदिनानें** एकाला हद्दपार केलें. **झेन-उल-आबिदिनानें** पन्नास वर्षांच्यावर राज्य केलें व अगदीं म्हातारपणीं सन १४७२ मध्यें तो वारला.

त्याचा मुलगा **हैदर** हा गादीवर आला. त्यानें पुनः हिंदूंचा छळ सुरू केला. पण तो अकालीं वारला. त्याचा मुलगा **हसन** यानें आजोबाचें धोरण स्वीकारलें व तो बरा राजा निपजला. पण पुढें कोणी नांव घेण्यासारखा राजा झाला नाहीं; राज्यव्यवस्था पार बिघडून गेली व देशांत बजबजपुरी व अंदाधुंदी माजली. म्हणून दिल्लीच्या बादशहाला **काश्मीर** काबीज करणें कठीण गेलें नाहीं. सन १५८७ मध्यें **अकबर** बादशहानें काश्मीर कायमचा काबीज केला व तो प्रांत तेव्हांपासून हिंदुस्थानांतील मोगल बादशाहीचा एक कायमचा घटक बनला, व त्या प्रांताचा सुभेदारामार्फत राज्य कारभार चालविण्यांत येऊं लागला. **शहाजहान** व **जहांगीर** यांचे अमदानींत काश्मीर खोरें बादशाहाचें उन्हाळ्यांतील शीतल निवासस्थान बनलें. **औरंग**झेब बादशाहानें साम्राज्याचें सामर्थ्य दक्षिणेंत मराठ्यांचा नायनाट करण्यांत खर्च केल्यामुळें त्याचे पश्चात् साम्राज्य मोडकळीस आलें; व सन १६३९ मध्यें **नादीरशाहानें** काश्मीर प्रांत काबीज करून आपल्या **अफगाणिस्थानच्या** राज्याला जोडला. सन १८१९ मध्यें पंजाबच्या **रणजीतसिंगानें** काश्मीर प्रांत **अमीर दोस्त महंमद** याजवर स्वारी करून आपल्या ताब्यांत घेतला व आपल्या राज्यांत सामील केला. याप्रमाणें सन १८१९ मध्यें काश्मीरांतील मुसलमानी कारकीर्द अस्तंगत झाली व पुनरपि हिंदु कारकीर्द सुरू झाली. हल्लींचें काश्मीर संस्थान कस स्थापन झालें व त्याचा विस्तार कसा झाला याचा हकीकत पुढील प्रकरणावर टाकणें इष्ट आह.

---

# प्रकरण ९ वें

## काश्मीर संस्थानचा विस्तार व स्थापना

हिंदुस्थानांत म्हैसूर, ग्वालेर, इंदूर, बडोदा व दक्षिण हैद्राबाद यां-सारखीं जीं मोठीं व पहिल्या प्रतीचीं संस्थानें आहेत त्यांपैकीं काश्मीर हें संस्थान आहे. याचें एकंदर क्षेत्रफळ ऐशीं हजार मैलांपेक्षां जास्त आहे. म्हणजे हें संस्थान जवळजवळ निजाम हैद्राबाद एवढें मोठें आहे; मात्र हें डोंगराळ मुलखांत असल्यामुळें येथली वस्ती पुष्कळ कमी आहे. संस्थानची एकंदर वसती सुमारें बत्तीस लक्ष आहे. संस्थानचें उत्पन्न एक कोटी-वर आहे. संस्थानचा आकार साधारण चौकोनी असून त्याचे जम्मू, काश्मीर, लहान तिबेट व गिलजित हे मुख्य चार प्रांत आहेत. हे प्रांत म्हणजे एकावरएक चढत्या अशा पायऱ्या आहेत.

**जम्मूप्रांत** हा पंजाबला लागून असून त्यांतला कांहीं भाग **झेलम, गुजरात, सियालकोट,** आणि **गुरदासपूर** या पंजाबांतील जिल्ह्यांच्याच सपाटीवर आहे. पुढें मात्र हिमालयाची पहिली रांग चढावी लागते, व ही सातआठ हजार फूट आहे. या रांगेमध्यें या संस्थानांतील दुसऱ्या पायरीवजा प्रांत लागतात. या सर्व भागांतून **चिनाब** व **झेलम** या नद्या वहात गेल्या आहेत. या भागांत रान फार आहे.

नंतर हिमालयाची **पीरपंजाल** नांवाची ओळ ओलांडली, म्हणजे काश्मीरची सुंदर दरी लागते. हिलाच कोणी **नंदनवन** म्हणतात. कोणी या दरीला मोत्यांच्या हारामध्यें बसविलेल्या पाचूची यथार्थ उपमा देतात. कारण या दरीच्या चारहि बाजूंना शुभ्र मोत्यांसारख्या बर्फानें आच्छादिलेल्या पर्वतांचीं शिखरें आहेत. काश्मीरच्या पुढें अठरा हजार-पासून पंचवीस हजार फूटपर्यंत उंच असलेली हिमालयाची रांग लागते

व ती ओलांडल्यावर संस्थानच्या तिसऱ्या पायरीवजा प्रांत लागतात. त्याच्यापुढें आणखी **गिलजित** नांवाचा प्रांत लागतो, व त्यानंतर तर सर्व जगांत उंच असलेले अठ्ठावीस हजार फुटांच्या उंचीचे **काराकोरम** पर्वत लागतात. ही या संस्थानची शेवटची पायरी होय, व ही पायरी ओलांडल्यावर पुनः सपाटीचा भाग लागतो.

याप्रमाणें संस्थानचे भाग म्हणजे वर वर चढणाऱ्या प्रचंड पायऱ्यांनीं झालेले प्रांत होत. दुसऱ्या तऱ्हेनें हें संस्थान म्हणजे **चिनाब, झेलम** व **सिंधु** या नद्यांच्या एकावर एक उंच असणाऱ्या दऱ्यांनीं झालेलें आहे असें म्हणतां येईल. अर्थात् संस्थानच्या खालच्या पायरीमधून **चिनाब** नदी गेली आहे. या संस्थानच्या दुसऱ्या पायरीमधून **झेलम** नदी गेली आहे, तिसऱ्या पायरीमधून सिंधु नदी गेली आहे. या तीनहि नद्यांची वहाण्याची तऱ्हा सारखीच आहे. या नद्या या संस्थानच्या पूर्वभागांतील दक्षिणेकडच्या प्रचंड हिमालयाच्या पर्वतराजींत उगम पावून प्रथमतः उत्तरेकडे वहात जातात, व मग एकदम दक्षिणवाहिन्या होऊन संस्थानच्या पश्चिमभागाकडून खालीं उतरत उतरत पंजाबच्या सपाट व सखल प्रदेशांत त्या वहात येतात. वरील वर्णनावरून, हें सर्व संस्थान पर्वतमय आहे, व जगांतील प्रचंड पर्वत जो हिमालय, त्यानें वेष्टिलेलें आहे, असें दिसून येईल. अर्थात् यांत जंगलें, रानें, मोठमोठे पहाड व घांट हींच जिकडे तिकडे दृष्टीला पडावीं, यांत नवल नाहीं. नद्यांच्या दऱ्यांच्या आसपास कमीअधिक सपाटीचा भाग आहे. व तेथेंच शेतकीची जमीन आहे; तसेंच निरनिराळ्या डोंगराच्या रांगांमध्यें ठिकठिकाणीं कांहीं भाग फार सुपीक आहेत व वसतीहि बरीच दाट आहे.

या संस्थानचा हिंदुस्थानलगतचा भाग म्हणजे **जम्मूप्रांत** होय. या प्रांताचें सामान्यस्वरूप पंजाबासारखेंच आहे. या प्रांताचें क्षेत्रफळ काश्मीर प्रांताच्या दुप्पट आहे. या प्रांताची लोकसंख्या सुमारें सोळा लाख असून त्यांत मुसलमान सुमारें नऊ लाख आहेत. बाकीचे हिंदु

आहेत. या प्रांताचें मुख्य शहर **जम्मू** असून, हें ब्रिटिश मुलखाच्या अगदीं नजीक व जम्मू प्रांताच्या दक्षिणेला आहे. पंजाबांतून पेशावर-कडे जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्यावरील **वजिराबाद** या स्टेशनापासून निराळा आगगाडीचा फांटा लागतो व तो **जम्मू** या शहरापर्यंत जातो. **वजिराबाद**पासून **जम्मू** बावन मैल आहे. काश्मीरच्या महाराजांची **जम्मू** ही हिवाळ्यांतील राजधानी आहे. या शहराची वसती बत्तीस हजार आहे. हें शहर समुद्रसपाटीपासून सारें बाराशें फूट उंच आहे. येथून काश्मीरसंस्थानच्या दुसऱ्या प्रांतांत जावयाला साधारण रस्ता आहे. अजून तो **झेलम** नदीच्या रस्त्याप्रमाणें गाडी व मोटार जाण्या-सारखा नाहीं; पण कांहीं कालानें हा रस्ताहि चांगल्यापैकीं होईल, असें दिसतें. काश्मीरसंस्थानची मुख्य राजधानी **श्रीनगर** शहर हें **जम्मूहून** सुमारें एकशें ऐंशी मैल आहे. अर्थात् हिमालयाची **पीरपंजाल** नांवाची ओळ ओलांडून हा मार्ग जातो. याला **बनिहाल** मार्ग म्हणतात. हा सर्व मार्ग काश्मीर संस्थानांतूनच गेला आहे.

जम्मू प्रांताची हवा पंजाबाप्रमाणें उष्ण आहे. तेथें नियमित पावसाळा आहे, व पावसाची सरासरी ४१ इंच आहे. जम्मू प्रांतांत डोग्रा नांवाच्या जातीच्या लोकांची वसती विशेष आहे. हे लोक रुंद बांध्याचे, ठेंगणे व काळसर रंगाचे आहेत. हे लोक स्वाभिमान, शौर्य व इमानीपणा या गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत. या प्रांतांत डोग्री व पंजाबी या भाषा बोलतात. संस्थानची अर्धी लोकसंख्या या एकाच प्रांतांत आहे.

काश्मीर संस्थानचा दुसरा प्रांत म्हणजे काश्मीरचा हिमालयवलयांकित सपाट प्रदेश होय. या प्रांताची बरीच माहिती या पुस्तकाच्या पूर्वींच्या प्रकरणांत येऊन गेली आहे. तेव्हां तिची पुनरावृत्ति करण्याचें कारण नाहीं. ही दरी पूर्वींच्या प्रचंड तलावांतील पाणी ओसरून झाली आहे, असें भूगर्भशास्त्रदृष्टया दिसतें. असें ठरविणारीं निदर्शकें पुष्कळ आहेत. या गोष्टीचें अप्रत्यक्ष प्रत्यंतर, कश्यपऋषीनें येथें असलेल्या **सतीसार** नांवाच्या सरोवराचें पाणी ओसरवून हा प्रांत निर्माण केला, व म्हणूनच

त्याला **कश्यपपुर, कश्यपमार, काश्मीर** म्हणतात, या दंतकथेवरूनहि येतें. या प्रांताची लोकसंख्या सुमारें तेरा लाख आहे. त्यांपैकीं बारा लाख मुसलमान आहेत; पण हे मुसलमान हिंदूचे बाटून झालेले आहेत. या प्रांतांतील लोक शुद्ध आर्यवंशांपैकीं आहेत. त्यांचा रंग, सतेजपणा व एकंदर शरीराची ठेवण यांवरून ही गोष्ट खरी आहे असें वाटतें. या प्रांतांत काश्मीरी भाषा प्रचलित आहे. ही भाषा संस्कृत व पर्शियन या दोन भाषांच्या मिश्रणानें झाली आहे. येथें **शारदी** नांवाची जुनी लिपी अजून चालू आहे. काश्मीरी लोक हुषार व उद्योगी आहेत. ते पाहुण्यांचा आदरसत्कार करणारे असून एकंदरींत सौम्य स्वभावाचे आहेत. त्यांच्याबद्दल युरोपीयन प्रवाशांनीं वाईट मत दिलेलें आहे; पण त्यांचें हें मत मजूरवर्गांतील लोकांच्या सहवासापासून बनलेलें आहे; कुलीन काश्मीरी लोकांचा त्यांच्याशीं फारसा संबंध न आल्यामुळें काश्मीरी लोकांचा खरा स्वभाव त्यांना कळत नाहीं; म्हणून युरोपीयन प्रवाशांचें असें एकतर्फी मत बनलें आहे. पण ज्या युरोपीयनांचा काश्मीरी लोकांशीं खरा निकट संबंध आला आहे, त्यांनीं त्यांच्याबद्दल अनुकूलच मत प्रदर्शित केलें आहे.

काश्मीर प्रांताचें हवापाणी उत्तम आहे. मात्र हिंवाळ्यांत तेथें अतोनात थंडी पडते. तेथें पाऊस साधारणपणें बाराहि महिने पडतो. यामुळें सर्वदा सृष्टीचा देखावा हिरवागार व म्हणून मनोहर असतो. काश्मीर प्रांतांत पावसाची सरासरी सत्तावीस इंच आहे. हा प्रांत सर्व बाजूंनीं पर्वतराजींनीं वेढिलेला असल्यामुळें येथें भयंकर वारे क्वचितच वहातात, आणि हवा एकंदर शांत व निवांत असते. हिंवाळ्याखेरीज येथील सर्व ऋतु सुखकर असतात. येथलें हवापाणी निरोगी असल्यामुळें येथें मनुष्यांची प्रकृति चांगली रहाते, व सुधारते. याचें प्रत्यक्ष उदाहरण आम्हीं ज्या बंगालीबाबूंकडे रहात होतों, त्यांचेंच होतें. हे गृहस्थ कलकत्त्याच्या कोंदट व हिंवतापी हवेंतून प्रथमतः काश्मीरांत आले, तेव्हां अगदीं किरकोळ, सडपातळ व फिकट होते. पण काश्मीरांतील वर्षदीडवर्षाच्या

निवासानें त्यांचें वजन पन्नास पौंड वाढलें, आणि ते सतेज व लालबुंद झाले, असें त्यांनीं आम्हांला स्वतःच सांगितलें.

काश्मीरसंस्थानचा तिसरा प्रांत म्हणजे लहान तिबेट होय. हा प्रांत काश्मीर प्रांताच्या पूर्वेला व उत्तरेला पसरलेला आहे. त्याचे **लडाक** व **बाल्टिस्तान** असे दोन पोटभाग होतात. **बाल्टिस्तान** काश्मीर प्रांताच्या उत्तरेला आहे, व **लडाक** पूर्वेला आहे. या प्रांताचें क्षेत्रफळ **जम्मू** व **काश्मीर** या दोन प्रांतांच्या दुप्पट आहे; पण येथली वसती अत्यन्त पातळ आहे. यामुळें एवढ्या मोठ्या क्षेत्रफळाच्या प्रांतांत लोकसंख्या सुमारें दीडलाखच्च आहे.

लहान तिबेट हा प्रांत समुद्रसपाटीपासून फारच उंच म्हणजे सरासरीनें दहाबारा हजार फुटांच्या वर आहे, व इतक्या उंचावर मनुष्यवसती असलेलीं ठिकाणें पृथ्वीवर फारच थोडीं आहेत. हा प्रांत दिसण्यांत काश्मीर इतका मनोहर नाहीं. कारण, येथें झाडें व रान वाढत नाहीं. पण येथल्या प्रांताचा विशेष म्हणजे उत्तरेच्या व पश्चिमेच्या बाजूंना असलेले सर्व जगांतील, अत्यंत उंच पर्वत व त्यांवरील प्रचंड हिमसंघ होत. या हिमसंघांचा देखावा केवळ अपूर्व आहे.

**लडाक** प्रांतांतील मुख्य शहर **लेह** हें होय. हें श्रीनगरपासून दोनशें त्रेचाळीस मैल आहे. हा रस्ता प्रथमतः **सिंध** नांवाच्या नदीच्या कडेनें जातो. येथलें सृष्टिसौंदर्य अप्रतिम आहे, असें म्हणतात. याच वाटेनें **सोना मार्ग** नांवाचें शीतल निवासस्थान लागतें, व **झोझीला** म्हणून घाट लागतो. **लेह** हें मोठें व्यापाराचें ठिकाण आहे. येथें हिंदुस्थानचे व्यापारी व मध्य आशियांतले व्यापारी एके ठिकाणीं जमतात. **लडाकचे** लोक बुद्धधर्मी असून ते मोंगोलियन वंशाचे आहेत. त्यांच्यामध्यें हिंदुस्थानच्याप्रमाणें चतुर्वर्णाची व्यवस्था आहे. तसेंच तेथें नेपाळी लोकां- प्रमाणें बहुपतित्वाचीहि चाल आहे. या प्रांतांत बुद्धधर्माचे पुष्कळ मठ असून त्यांना **गुप** म्हणतात. **लेह** शहरापासून अठरा मैलांवर **हेमी** नांवाचा प्रसिद्ध मठ आहे.

लहान तिबेटाचा दुसरा पोटभाग **बाल्टिस्तान** हा असून याचें मुख्य शहर **स्कार्डु** हें होय. हें शहर श्रीनगरपासून दोनशें पसतीस मैल आहे. सुमारें शंभर मैलपर्यंत **श्रीनगर-लेह** रस्ता आणि **श्रीनगर-स्कार्डु** रस्ता एकच आहे. पुढें मात्र एक उत्तरेला जातो, व एक पूर्वेकडे वळतो. **बाल्टिस्तान** हें **लडाक** प्रांतापेक्षां सखल आहे. **स्कार्डु** हें साडेसात हजार फुटांवर आहे. या पोटभागाची लोकवसती बहुतेक मुसलमानी असून तेथील लोक **गिलजित** प्रांतांतील लोकांसारखेच आहेत. या दोन्ही पोटभागांतून सिंधुनदी वहात गेली आहे. **स्कार्डु** येथें दोन्ही बाजूंचे डोंगर बरेच दुरावले असल्यामुळें सपाट मैदान पुष्कळ आहे. तेथील शेतकीहि चांगली आहे.

काश्मीरसंस्थानचा शेवटचा प्रांत म्हणजे **गिलजित** हा होय. हा काश्मीर प्रांताच्या उत्तरेला आहे. या प्रांतांतील मुख्य शहर **गिलजित** हें होय. हें श्रीनगरपासून दोनशें अठ्ठावीस मैल आहे. हा प्रांत **बाल्टिस्तान**पेक्षांहि सखल आहे.

**गिलजित** शहर चार हजार आठशें फुटांच्या उंचीवर आहे. म्हणजे श्रीनगरपेक्षांसुद्धां चारपांचशें फूट तें खालीं आहे. **गिलजित** हें **सिंधु** नदीच्या उत्तरेला आहे. दक्षिणेकडील हिमालयांत अठ्ठावीस हजार फुटांच्या उंच पर्वतांमधून निघून हळूहळू खालीं खालीं उतरत **सिंधू** नदी **गिलजितच्या** जवळ पांच हजार फुटांपर्यंतच्या सपाटीवर येते. येथपर्यंत ती नदी उत्तरवाहिनी आहे. येथेंच एकदम ती दक्षिणवाहिनी होते, व **नंगा** पर्वताच्या उत्तरेकडच्या पायथ्यानें पश्चिमेकडे जाते, व मग **स्वाट** दरींतून थेट दक्षिणेकडे वळून, सारखी दक्षिणवाहिनी होऊन आरबी समुद्राला मिळते. हा प्रांत कांहींसा काश्मीर प्रांतासारखा आहे, व येथें काश्मीर प्रांतांत होणारीं सर्व पिकें व फळें होतात. येथें पाऊस मात्र थोडा पडतो. येथली पावसाची सरासरी साडेचार इंचच आहे.

हल्लींचें अवाढव्य काश्मीरसंस्थान हें भोपाळसंस्थानाप्रमाणें एका कर्तृत्ववान् पुरुषाच्या श्रमाचें फळ आहे. बाकी काश्मीरच्या चारहि

प्रांतांत साम्य कांहींच नाहीं. वर वर्णन केलेल्या प्रांतांची भूगोलविषयक परिस्थिति अगदीं निरनिराळी आहे. तेथील लोक निरनिराळे आहेत; सर्व प्रांतांच्या भाषा व रीतरिवाज निरनिराळे आहेत. तरीपण हल्लीं हे प्रांत एका राजछत्राखालीं आले आहेत. या संस्थानच्या कोंदणांत **काश्मीर** हा प्रांत पाचूप्रमाणें आहे. या प्रांताचा इतिहास व बऱ्याच काळची माहिती 'राजतरंगिणी' या ऐतिहासिक संस्कृत ग्रंथांत आहे. 'राजतरंगिणी'चा कर्ता कल्हण यानें तो ग्रंथ इ. स. ११४८ मध्यें लिहिला. त्यानें दंतकथा व इतिहास यांचा धागा आपल्या काळपर्यंत आणला. 'जोन-राज' नांवाच्या कवीनें तो इतिहास इ. स. १४२० पर्यंत आणला. याच काळांत काश्मीरांतील हिंदु राज्य जाऊन मुसलमानी राज्य झालें. श्रीवर कवीनें हा इतिहास इ. स. १४८६ पर्यंत आणून पोहोंचविला, व शेवटच्या संस्कृत कवीनें तो इ. स. १५८६ पर्यंत आणिला. या वर्षी अकबर बादशहानें हा प्रांत काबीज केला, व हरिपर्वतावर एक मजबूत किल्ला बांधला. तेव्हांपासून काश्मीर हा प्रांत मोंगल बादशाहीचा एक परगणा झाला व बादशहांचें श्रीनगर हें शीतलनिवासस्थान बनलें. जहांगीर व शहाजहान या दोन बादशहांचें तर तें आवडतें ठिकाण होतें. जहांगीराला तर हें ठिकाण इतकें प्रिय होतें, कीं, मरतांनासुद्धां काश्मीरची आठवण काढून त्यानें प्राण सोडला. काश्मीरांतील प्रसिद्ध बागबगीचे याच दोन बादशहांच्या कारकीर्दींतील आहेत. औरंगजेब हा काश्मीरांत एकदांच गेला होता व प्रसिद्ध बर्नियर प्रवासी त्याच्याच बरोबर काश्मीरांत आला होता; परंतु औरंगजेबाच्या कारकीर्दींतच मोंगलबादशाहीची मोडतोड होत गेली.

इ. स. १७५१ मध्यें काश्मीर स्वतंत्र राज्य बनलें; पण लवकरच अफगाण व दुराणी लोकांच्या ताब्यांत हा प्रांत गेला, व त्या काळीं लोकांवर फार जुलूम झाला, तेव्हां तेथील लोकांनीं पंजाबांत नवीन उदयाला आलेल्या शीख राष्ट्राच्या नायकाकडे मदत मागितली. **रणजितसिंगानें** काश्मीरवर प्रथम इ. स. १८१४ मध्यें स्वारी केली;

पण ती यशस्वी झाली नाहीं. इ. स. १८१९ मध्यें पुनः आपला प्रख्यात सेनापति मिसर दिवाणचंद याला रणजितसिंगानें काश्मीरच्या स्वारीवर पाठविलें. या स्वारींत जम्मूचा सरदार **गुलाबसिंग**—हल्लींच्या प्रचंड काश्मीर संस्थानाचा प्रस्थापक—हाहि होता. ही स्वारी यशस्वी झाली, व काश्मीर शीख लोकांच्या ताब्यांत आलें.

गुलाबसिंग हा डोग्राजातीचा रजपूत असून त्याचें जम्मू येथें लहान संस्थान होतें; पण त्यानें रणजितासिंगाकडे नोकरी धरली; व आपल्या शौर्यादि गुणांनीं तो पुढें आला. त्यानें आसपासच्या लहानलहान संस्थानिकांना पादाक्रांत केलें, व त्या प्रांतांत शांतता प्रस्थापित केली. १८२० सालीं रणजितसिंगानें 'जम्मूचा राजा' असा किताब देऊन गुलाबसिंगाचा गौरव केला. **किस्तावर** हा परगणा त्यानें घेतल्यावर त्याच्या मनांत **लडाक** हा मोठा—पण अज्ञात—प्रांत काबीज करण्याचा विचार आला, व त्यानें तो लवकरच तडीलाहि नेला. आणखी कांहीं वर्षांनीं म्हणजे १८४० सालीं त्यानें **लडाक** प्रांताला लागूनच असलेला **बाल्टिस्तान** हा प्रांतहि काबीज केला. याप्रमाणें इ. स. १८४० च्या सुमाराला काश्मीर प्रांताच्या तीनहि बाजूंना गुलाबसिंगाचें राज्य पसरलें. १८४५ सालांत शीख व इंग्रज यांचें युद्ध सुरू झालें. या युद्धांत गुलाबसिंग सामील झाला नाहीं. व यामुळेंच इंग्रजांना जय मिळाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या अप्रत्यक्ष मदतीकरितां गुलाबसिंगाला काश्मीर प्रांत—जो तोंपर्यंत शीख लोकांच्या ताब्यांत होता—देण्यांत आला. या देणगीला बाह्यतः सामान्य देवघेवीचें स्वरूप यावें याकरितां गुलाबसिंगाकडून या प्रांताबद्दल पंचाहत्तर हजार रुपये इंग्रज सरकारनें घेतले, परंतु काश्मीर प्रांत गुलाबसिंगाच्या प्रत्यक्ष ताब्यांत येण्यास त्रास व मेहनत पडलीच. लवकरच काश्मीर त्याच्या ताब्यांत आला; पण **गिजलित** प्रांत जो शिखांच्या अंमलाखालीं गेला होता, तो ताब्यांत आला नाहीं. गुलाबसिंगानें तो ताब्यांत आणण्याचा प्रयत्न करून **गिलजितचा** किल्ला काबीज केला. पण इ. स. १८५२ मध्यें सैन्यांत फितुरी होऊन डोग्रा

सैन्य मारलें गेलें, आणि **गिलजित** प्रांत गुलाबसिंगाच्या ताब्यांतून गेला. गुलाबसिंगाला आतां 'महाराजा' असा किताब देण्यांत आला होता. गुलाबसिंग इ. स. १८५७ मध्यें मृत्यु पावला. त्याचा मुलगा **रणवीरसिंग** हा गादीवर आला, व त्यानें शिपायांच्या बंडाच्या वेळीं इंग्रजसरकारला उत्तम मदत केली. या बंडाची धामधूम व त्यामुळें संस्थानला आलेल्या अडचणी संपल्यानंतर **रणवीरसिंग** महाराजांनीं **गिलजित** प्रांत परत मिळविण्याचा प्रयत्न केला, व इ. स. १८६० मध्यें महाराजांनीं तो प्रांत आपल्या ताब्यांत आणला. तेव्हांपासून **गिलजित** प्रांत काश्मीर संस्थानचा एक भाग झाला. रणवीरसिंग हा फार चांगला राजा होता. पण गुलाबसिंगाची कर्तबगारी त्याच्यांत नव्हती. रणवीरसिंग १८८५ सालीं वारला, व त्याचा मोठा मुलगा **प्रतापसिंग** हा गादीवर आला. यांच्या कारकीर्दींत संस्थानांत किती तरी सुधारणा झाल्या. त्यांतली मुख्य म्हणजे उत्तम रस्ते ही होय. यामुळें व व्यवस्थित राज्यपद्धतीनें काश्मीर हिंदुस्थानला सुलभदर्शन झाला. **प्रतापसिंग** महाराज हे १९२५ मध्यें वारले, आणि त्यांच्या गादीवर हल्लींचे महाराज **सर हरीसिंग** हे बसले. तेच काश्मीरचे हल्लीं अधिपति आहेत. यांचे कारकीर्दींत अगदीं अलीकडे हिंदू-मुसलमानांचा दंगा झाला. तो शांत झाल्यानंतर महारजांनीं आपल्या संस्थानांत प्रातिनिधिक लोकसभा १९३४ सालीं स्थापन केली.



# प्रकरण १० वें

## शंभर तासांत स्वस्थानीं.

मागील एका प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें या शेवटच्या प्रकरणांत मी माझ्या प्रत्यागमनाची हकीगत देऊन वाचकांची रजा घेणार आहें. ज्याप्रमाणें नंदनवनाच्या विस्ताराच्या मानानें आमचा तेथला निवास म्हणजे निमिषार्धाचाच झाला, त्याप्रमाणेंच आमचें प्रत्यागमनहि विलक्षण घाईचें झालें. श्रीनगरहून निघाल्यापासून आम्ही सारखे प्रवासच करीत होतों! घरीं येईपर्यंत आमच्या प्रवासाला खळ म्हणून पडला नाहीं. इतका जलद, इतका एकसारखा व इतका दगदगीचा प्रवास आजन्मांत मीं केला नव्हता. बाकी आम्ही सर्व महिनाभर प्रवासच करीत होतों. एका महिन्यांत जाऊन येऊन सुमारें साडेतीन हजार मैल लांबीचा आमचा प्रवास झाला. एक महिन्याच्या प्रवासाचें वर्णन देण्यास मला दोन पुस्तकें लिहावीं लागलीं. आतां प्रस्तुत प्रकरणांत प्रवासाची आरती करावयाची आहे. या प्रत्यागमनाच्या प्रवासांत आम्हांला इतक्या अडचणी आल्या, वेळवर पोहोंचण्याकरितां आम्हांला आमच्या पैशाच्या पिशवीचें तोंड इतकें सैल करावें लागलें, व एकंदर इतका त्रास व दगदग सोसावी लागली, कीं, या प्रवासांत, लहानपणीं वाचलेल्या **जूल्सव्हर्न** या फ्रेंच कादंबरीकाराच्या **ऐशी दिवसांत पृथ्वीप्रदक्षिणा** या नांवाच्या कादंबरीची व त्यांतील प्रसंगांची राहून राहून मला आठवण होत होती. त्या कादंबरींतील नायकाचा प्रवास प्रचंड व दुर्घट पृथ्वीप्रदक्षिणेचा होता; आमचा त्या मानानें किती लहान, **कोठें इंद्राचा ऐरावत व कोठें शामभटाची तट्टाणी** अशांतला! पण जरी या दोनहि प्रवासांत इतकें जमीनअस्मानाचें अंतर होतें, तरी त्यांत आलेले अनुभव, अडचणी, प्रसंग, त्यांतून निभावून जाण्याकरितां काढलेले मार्ग

आणि विशेषतः वेळेवर पोहोंचण्याकरितां झालेली मनाची व शरीराची धडपड यांमध्यें पुष्कळच साम्य आहे. म्हणून, आणि केव्हांकेव्हां कल्पनेंत आणि वस्तुस्थितींत नांवापलीकडे फारसें अंतर नसतें हें दाखविण्याकरितां, माझ्या प्रत्यागमनाच्या हकीकतीच्या आधीं उपरिनिर्दिष्ट कादंबरीचें कथानक थोडक्यांत येथें देण्याचें योजिलें आहे.

१८७२ सालीं लंडनमध्यें मिस्टर **फॉग** नांवाचा एक मनुष्य रहात असे. तो अविवाहित असून घरीं एकटाच असे. **फॉग** म्हणजे एक विलक्षणच व्यक्ति होती. तो फार व्यवस्थित व अत्यंत नियमित असे. त्याचा सर्व व्यवहार मिनिट–सेकंडप्रमाणें मोजलेला असावयाचा. त्यानें **पासेपारटाऊट** नांवाचा एक फ्रेंच नोकर ठेवतांना त्याला सांगितलें, " या क्षणापासून म्हणजे ता. २ आक्टोबर १८७२ रोजीं अकरा वाजून एकोणतिसाव्या मिनिटापासून मीं तुला नोकरीवर ठेविलें आहे. "

या गृहस्थाला पत्ते खेळावयाचा फार नाद असून तो **रिफॉर्म क्लब** मध्यें जाऊन नियमितपणें पत्ते खेळत असे. तारीख २ आक्टोबर रोजीं तो नेहमींप्रमाणें क्लबांत गेला असतां एका विलक्षण चोरीबद्दल तेथें बोलणें चाललें होतें. **लंडन** ब्यांकेंतून चोरानें पंचावन हजार पौंडांच्या नोटा चोरल्या होत्या. पत्ते चालू असतां याच विषयावर खूब वादविवाद चालला होता.

" तो चोर कोठें जाणार ? सांपडलाच पाहिजे ! " एक गृहस्थ म्हणाला.

दुसरा म्हणाला " त्याला जगांत किती तरी जागा रिकाम्या आहेत ! "

मिस्तर **फॉग** म्हणाला " पूर्वीं होत्या ! "

दुसरा एक गृहस्थ म्हणाला " म्हणजे काय ? आतां काय जग संकुचित झालें आहे ? "

तिसरा म्हणाला " होय; प्रवासाच्या साधनांनीं जग लहान झाल्यासारखेंच आहे. कारण, हल्लीं पूर्वींपेक्षां दसपट जलद पृथ्वीप्रदक्षिणा करतां येते. "

पुनः दुसरा गृहस्थ म्हणाला "तीन महिन्यांत हल्लीं पृथ्वीप्रदक्षिणा करतां येते; या दृष्टीनें पृथ्वी लहान झाल्यासारखीच आहे खरी !"

मिस्तर **फॉग** म्हणाला "तीन महिने कशाला ? ऐशीं दिवसांत पृथ्वीप्रदक्षिणा करतां येईल !"

दुसरा गृहस्थ आश्चर्यानें म्हणाला "काय ऐशी दिवसांत ?"

तिसरा गृहस्थ म्हणाला "हिंदुस्तानांत रेल्वे झाल्यापासून एशी दिवसांत पृथ्वीप्रदक्षिणा करणें शक्य आहे, व त्याचा क्रम एका ठिकाणीं दिलाहि आहे. पण हा निवळ कागदीं हिशेब झाला; प्रत्यक्ष प्रवासांत किती तरी अडचणी येतात. त्या नको का हिशेबांत धरायला ? आणि असें केलें म्हणजे ही गोष्ट अशक्य कोटींपैकींच आहे !"

मिस्तर **फॉग** ह्मणाला "या सर्व गोष्टी हिशेबांत धरूनहि ऐशी दिवसांत पृथ्वीप्रदक्षिणा शक्य आहे."

पहिला गृहस्थ म्हणाला "तुम्ही करतां कां ऐशी दिवसांत पृथ्वीप्रदक्षिणा ? करीत असाल, तर मी चार हजार पौंडांची पैज लावतों."

**फॉग** म्हणाला "कबूल आहे मला ! बँकेंत माझे वीस जार पौंड आहेत. पैज हरल्यास ते मी तुम्हाला देईन."

झालें ! पैज ठरली !

**फॉग** म्हणाला "आज बुधवार तारीख २ आक्टोबर आहे. या खोलींत मी तारीख २१ डिसेंबर रोजीं रात्रीं पावणेनऊ वाजतां परत येईन. आलों नाहीं तर वीस हजार पौंड तुमचे ! हा घ्या त्याबद्दलचा चेक !"

लागलींच अशा अटींच्या कराराचा कागद झाला. मिस्टर **फॉग** अगदीं शांत होता. तो सात वाजेपर्यंत क्लबांत खेळला. व घरीं जाऊन प्रवासाकरितां वीस हजार पौंड बरोबर घेऊन नोकरासह पावणेनवाच्या गाडींत बसला. अशा रीतीनें मिस्तर **फॉगच्या** पृथ्वी प्रदक्षिणेला प्रारंभ झाला.

त्यानें प्रवासाचें टिपण ठेविलें, व ठरल्यावेळीं आपण ठरल्या ठिकाणीं आलों किंवा नाहीं, लवकर आलों कीं उशीरां आलों, याचेंहि कलमवार टांचण त्यानें ठेविलें.

मिस्तर **फॉग** याच्या विलक्षण पैजेची व त्याच्या प्रवासाची बातमी सर्व वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली. त्यांत मिस्तर **फॉगचें** स्वरूपवर्णनहि आलें होतें.

मिस्तर **फॉग** साडेसहा दिवसांनीं **सुएझ** येथें आला, व आपल्या पासपोर्टवर इंग्रज कॉन्सलची सही घेण्याकरितां बंदरावर गेला. तेथें दोन दिवस आधींच आलेल्या **फिक्स** नांवाच्या पोलिस डिटेक्टिव्हशीं त्याची गांठ पडली.

**फॉगच्या** एकंदर घाईवरून व चेहऱ्यावरून बँकेंतील पंचावन हजारांच्या नोटा चोरणारा हाच मनुष्य असावा, असें त्या डिटेक्टिव्हला वाटलें. म्हणून **फॉगला** पकडण्याबद्दलचें वॉरंट मुंबईला पाठविण्याची लंडनला तार करून तो स्वतः त्याच बोटीनें मुंबईस निघाला.

तांबड्या समुद्रांतून व हिंदी महासागरांतून मिस्तर **फॉगचा** प्रवास जलद झाला, व ती बोट मुंबई बंदरांत ठरल्या वेळेच्या दोन दिवस आधीं, म्हणजे २० आक्टोबर रोजीं आली. चार तासांनीं कलकत्ता मेल निघावयाची होती. **फॉग** यानें **सुएझ**प्रमाणें तेथल्या कॉन्सलची सही आपल्या पासपोर्टवर घेतली. इकडे **पासेपारटाऊट** मुंबई पहाण्याकरितां शहरांत गेला, तो नकळत एका देवळांत शिरला. यामुळें देवळांतल्या उपाध्यायांना त्याचा राग आला. पण पासेपारटाऊट आपली टोपी व जोडे तेथेंच टाकून धांवत धांवत स्टेशनवर आला. इकडे डिटेक्टिव्ह **फिक्स** यानें कॉन्सलकडे जाऊन वॉरंटाबद्दल चवकशी केली. पण तें येणें अशक्यच होतें. त्याला तेथले अधिकारी वॉरंट देईनात. म्हणून या माणसाला तेथें कसा अडकवून धरावा, या विवंचनेंत तो आहे, तोंच त्याला **फॉगच्या** नोकराच्या आगळिकीची बातमी लागली. तेव्हां कलकत्त्याला जाऊन या

मंडळीला अटक करण्याचा निश्चय करून तो मागें राहिला, आणि **फॉग** व त्याचा नोकर हे कलकत्त्याच्या गाडीनें पुढें चालले.

आगगाडी **अलाहाबादेच्या** मागें पन्नास मैलांवर थांबली, व गाडीच्या गार्डनें सगळ्यांना उतरण्यास सांगितलें. '**अलाहाबादे**पर्यंत चालत किंवा दुसरी हवी ती व्यवस्था करून उतारूंनीं गेलें पाहिजे. कारण, अजून इतका रस्ता रूळ टाकून तयार झाला नाहीं,' असें त्यानें सर्वांना कळविलें. असा प्रसंग आला, तरी **फॉगनें** आपली शांतता मुळींच ढळूं दिली नाहीं, व चालत जाण्याचा त्यानें निश्चय केला. इतक्यांत त्याच्या नोकरानें जवळच हत्तीचें वाहन मिळण्यासारखें आहे, असें त्याला सांगितलें. म्हणून **फॉग** त्या हत्तीवाल्याकडे गेला; पण तो हत्तीवाला भाड्यानें हत्ती देण्यास तयार होईना. तेव्हां **फॉगनें** तो हत्ती दोन हजार पौंडांना विकत घेतला, व एका पारशी गृहस्थाला वाटाड्या महात म्हणून घेऊन व खाण्यापिण्याचें सामानहि बरोबर घेऊन मंडळी हत्तीवरून जाऊं लागली.

त्यांना एका मोठ्या रानांतून जावयाचें होतें. नऊ वाजतां निघून सायंकाळपर्यंत ते पंचवीस मैल चालून गेले, व रात्रीं एका बंगल्यांत विसावा घेण्याकरितां राहिले. दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं चाराच्या सुमाराला त्यांना एक मोठी मिरवणूक दिसली. त्या पार्शी गृहस्थानें तिच्याकडे निरखून पाहून म्हटलें "ही एक सतीची मिरवणूक आहे. ही स्त्री तरुण असून ती एका म्हाताऱ्या राजाला दिली होती. त्या म्हाताऱ्याच्या प्रेताबरोबर तिला जाळावयाला नेत आहेत. पहांटेला तिला व नवऱ्याला चितेवर ठेवून जाळतील!"

भयंकर गोष्ट ऐकून **फॉगला** त्या स्त्रीची दया आली, व त्यानें तिला सोडविण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें हत्तीवरील सर्व मंडळी ज्या देवळांत त्या स्त्रीला नेलें होतें तेथें चोरून गेली. **फॉगचा** बेत असा होता, कीं, त्या स्त्रीबरोबरचे शिपाई व उपाध्याय झोंपीं गेले, कीं, तिला पळवून न्यावयाची; पण त्याला तशी संधि मिळाली नाहीं.

कांहीं वेळानें लांकडाची चिता रचून त्यावर त्या प्रेतास ठेवून त्याजवळ त्या स्त्रीला जुलमानें बसविण्यांत आलें. उपाध्यायांनीं चिता पेटविली. ती सारखी धुरकटत होती. **फॉगला** त्या 'सती' बद्दल अत्यंत वाईट वाटत होतें. इतक्यांत त्याच्या धाडशी नोकरानें काळोखांतून हळूंच चितेवर जाऊन त्या स्त्रीला उचलून धरलें. त्यामुळें प्रेत जिवंत झालें, असें जवळच्या माणसांना वाटलें, व तीं सैरावैरा पळत सुटलीं. इतक्या धांदलींत त्या नोकरानें त्या स्त्रीला **फॉग**जवळ आणलें, व तिला लागलींच हौद्यांत घेऊन **फॉग** झपाट्यानें पुढें सरसावला. **फॉगच्या** नोकराच्या विलक्षण धाडसानें ती अनाथ स्त्री वांचली, व आपल्या खटपटीला यश आलें, हें पाहून **फॉगला** अत्यंत आनंद झाला. त्या स्त्रीला अफूसारखे कांहीं मादक पदार्थ चारल्यामुळें ती बेशुद्धच होती.

मिस्तर **फॉग** अलाहाबादला पोहोंचला. त्यानें तो हत्ती त्या पारशी वाटाड्याला इनाम दिला. त्या स्त्रीकरितां कांहीं कपडे घेऊन ती तीन मंडळी **कलकत्त्याच्या** गाडींत बसली, व तारीख २५ आक्टोबरला सकाळीं सात वाजतां **कलकत्त्यास** येऊन पोहोंचली. **फॉग** स्टेशनवरून उतरतो, तों एका पोलिसानें त्या मंडळीला पोलीस ठाण्यावर नेलें, व तेथें अटकेंत ठेविलें! आतां दोन प्रहरीं निघणारी आगबोट मिळण्याची मुष्कील झाली! साडेआठ वाजतां न्यायाधीश येऊन **पासेपारटाऊट** यानें मुंबईस केलेल्या देवळांत शिरण्याच्या अपराधाबद्दल चवकशी करून त्यानें त्याला पंधरा दिवसांची शिक्षा दिली. हें सर्व कृत्य अर्थात्‌च त्या डिटेक्टिव्हचें होतें. त्यानें **फॉगला** थांबविण्याकरितां ही घोरपड त्याच्यावर आणली होती; पण **फॉगनें** शांतपणानें न्यायाधीशाला आपल्या नोकराला जामिनावर सोडण्याची विनंति केली, व न्यायाधीशानेंहि दोन हजारांच्या जामिनावर त्याला मोकळें केलें. **फॉगनें** दोन हजार रुपये रोख काढून दिले, व ते त्रिवर्ग बोटीकडे गेले. हा सर्व प्रकार पाहून **फिक्स** मनांत भारीच चडफडला; पण नाइलाज

म्हणून त्यानें **कलकत्त्याहून हाँगकाँगला** जाण्याचा बेत केला, व त्याच आगबोटीनें तोहि निघाला.

'**रंगून**' या बोटीचा प्रवास प्रथम चांगला झाला; पण पुढें मोठें वादळ झालें, व त्यामुळें आगबोट वेळेवर जाईल असें दिसेना. या प्रवासांत 'सती' च्या अनर्थापासून सोडविलेली स्त्री—हिचें नांव मिसेस **आवडा** व मिस्तर **फॉग** यांची चांगली ओळख झाली. तसेंच **फिक्स**नेंहि **पासेपारटाऊटचा** स्नेह संपादला, व तो त्याच्यापासून **फॉगबद्दल** माहिती काढूं लागला. माहितीवरून **फॉग** हाच त्या नोटांचा चोर असला पाहिजे, अशी त्याची जास्त जास्त खातरी होत चालली. आपलें वॉरंट **हाँगकाँगला** तरी येईल, अशी त्याला आशा होती. पुढें वॉरंट येऊन उपयोग नव्हता. कारण, पुढें ब्रिटिश प्रांत कोठेंच लागणार नव्हता; म्हणून **फॉगला** कांहीं तरी करून अडकविण्याचा त्याचा बेत होता. म्हणून तुफानामुळें त्याला आनंदच झाला.

पण लवकरच हें तुफान शांत झालें, व तारीख ६ नवंबर रोजीं सकाळीं सहा वाजतां **हाँगकाँग** बंदरांत बोट आली. **हाँगकाँगहून याकोहामाला** जाणारी बोट तारीख ५ नवंबर रोजीं निघावयाची होती. अर्थात् **फॉगला** बोट मिळणें शक्य नाहीं, म्हणून **फिक्सला** आनंदाचें भरतें आलें; पण या अडचणीमुळें **फॉग** घाबरला नाहीं. त्यानें शांतपणें "**याकोहामाची** बोट केव्हां निघणार?" असें खलाशास विचारलें.

त्यानें उत्तर दिलें, "उद्यां सकाळीं. बोटीचा बॉयलर मोडला असल्यामुळें तिला काल निघतां आलें नाहीं."

**फॉगचें** काय जोरावर नशीब पहा! या बाबतींत **फिक्सचा** मात्र तडफडाट झाला.

**फॉगनें** प्रथमतः बंदरावर उतरल्यावर मिसेस **आवडाच्या** नातेवाइकाची ( तो **हाँगकाँगला** व्यापारी आहे, असें तिला ठाऊक होतें, ) चवकशी केली; पण तो तेथून कोठें निघून गेला होता, असें त्यांना

समजलें. तेव्हां मिसेस **आवडाला** फॉगनें यूरोपांत नेण्याचा निश्चय केला व **हाँगकाँगलां** जाणाऱ्या बोटीवर तीन जागा रिझर्व्ह करण्याकरितां आपल्या नोकराला सांगून **फॉग** व मिसेस **आवडा** एका हॉटेलांत उतरलीं.

**फिक्सहि** त्या नोकराबरोबर गेला; कारण, **हॉगहॉग** येथें कॉन्सल-जवळ चवकशी करतां वॉरंट आलें नसल्याचें त्याला कळलें. बोटीवर गेल्यावर **पासेपारटाऊटला** कळलें, कीं, बोट अजमासापेक्षां लवकरच दुरुस्त झाल्यामुळें ती रात्रींच निघून जाणार! ही बातमी **फॉगला** समजली तर तो आपल्या हातचा कायमचा निघून जाणार, असें **फिक्सला** वाटलें, म्हणून कांहींहि करून बोटीच्या निघण्याच्या वेळेच्या बदलाची बातमी **फॉगला** कळूं द्यावयाची नाहीं, असा निश्चय करून त्यानें **पासेपारटाऊटला** आपल्या कटांत घेण्याचा बेत केला!

बोटीचीं तिकिटें घेतल्यावर ते दोघे एका चहाच्या दुकानांत गेले, व तेथें **फिक्सनें**, 'आपण कोण आहों, **फॉग** हाच कसा चोर असावा, पृथ्वीप्रदक्षिणा हें त्याचें निवळ ढोंग आहे, तेव्हां **हाँगकाँग** येथें त्याला अडकवून ठेवण्यास तूं मदत केल्यास बँकेनें चोर धरून देणाराला ठेव-लेलें अर्धें बक्षीस तुला मिळेल,' असें आमिष त्याला दाखविलें; पण तो इमानी नोकर धन्याचा विश्वासघात करण्यास तयार होईना. तेव्हां **फिक्सनें** त्या नोकराला नकळत बोलतां बोलतां शेजारींच पडलेली अफूची चिलीम ओढण्यास दिली, व तिचा थोडासा धूर पोटांत गेल्या-बरोबर तो तेथेंच बेशुद्ध होऊन पडला.

सकाळीं, आपला नोकर जागेवर नाहीं म्हणून **फॉगला** आश्चर्य वाटलें, पण सामानसुमान घेऊन तो बंदरावर आला, तों काय? त्याला कळलें, कीं, **कर्नाटक** बोट रात्रींच **याकोहामाला** गेली! **फिक्सहि** बंदरावर आला होता. त्यानें थाप मारली, कीं, आपलीहि बोट **फॉगच्या**-प्रमाणेंच गैरसमजामुळें चुकली. कांहीं झालें तरी **फॉग** हा धैर्य सोड-णारा मनुष्य नव्हता. त्यानें सर्व बंदरांत **याकोहामाला** जाणाऱ्या

बोटीचा तीन तास शोध केला. शेवटीं एका लहान जॉलीबोटीचा मालक त्याला भेटला.

त्याला **फॉग** म्हणाला, " माझी कर्नाटक बोट चुकली. मला **याकोहामाला** जावयाचें आहे, व तेंहि चार दिवसांत. "

त्या बोटवाल्यानें सांगितलें, " **शांघाय** हें बंदर जवळ असून अमेरिकेला जाणारी बोट तेथून निघते; तेथें चार दिवसांत जाणें शक्य आहे. "

झालें ! **फॉगनें** त्याला शंभर पौंड रोज ठरवून बोटीनें जाण्याचा बेत केला, व **फिक्सलाहि** यावयाचें असल्यास त्यानें बरोबर बोलाविलें. एका तासांत ही तीन मंडळी त्या जॉली बोटींत येऊन बसली. **फॉगनें** आपल्या नोकराची चवकशी करण्याकरितां पोलीसजवळ कांहीं पैसे दिले.

लहानशा जॉली बोटींतून तुफानी समुद्रांतून प्रवास करणें म्हणजे बिकट कांम होतें; पण **फॉगनें** तें तडीस नेलें. ते **शांघायपासून** एकदोन मैलांवर येत आहेत, तोंच अमेरिकेला जाणारी बोट त्यांना दिसली. तेव्हां **फॉगनें** तोफ उडविण्यास व संकटाचें निशाण उभारण्यास बोटीच्या मालकाला सांगितलें.

ही खूण त्या आगबोटीला समजली, व तिनें या जॉली बोटींतील मंडळीला वर घेतलें. **फॉगनें** जॉली बोटीच्या मालकाला भाडें व वर दोनशें पौंड बक्षीस दिले. तेथून ते **याकोहामाला** गेले.

इकडे **पासेपारटाऊट** अफूच्या चिलमीनें जो झिंगून पडला, तो जागा झाल्याबरोबर उशीर झाला म्हणून कर्नाटक बोटीवर गेला, व त्या बोटीनें तो **याकोहामाला** आला. आपल्या मूर्खपणानें धन्याची पैज हरणार, म्हणून त्याला अतोनात वाईट वाटलें; पण तो तेथें कफल्लकच गेला होता. तेव्हां त्यानें अमेरिकेला जाणाऱ्या एका सरकस कंपनींत नोकरी धरली. ती सरकस पहाण्यास **फॉग** व मिसेस **आवडा** हीं आलीं होतीं.

त्यांना पाहिल्याबरोबर **पासेपारटाऊटनें** आपलें सरकशींतलें काम सोडलें; व तो आपल्या धन्याजवळ आला. **फॉगला** आपला नोकर परत आल्या-बद्दल अर्थात्च भारी आनंद झाला.

**याकोहामाला** उतरल्याबरोबर डिटेक्टिव्ह **फिक्स** इंग्रजी कॉन्सल-कडे गेला. तेथें त्याला वॉरंट मिळालें. पण आतां त्याचा काय उपयोग होता ? कारण, आतां इंग्रजी अंमलाखालील मुलूख पुढें सर्व प्रवासांत कोठेंहि लागावयाचा नव्हता. म्हणून त्यानें आतां **फॉगबरोबर** इंग्लंडांत जावयाचें व तेथें त्याच्यावर वॉरंट बजावावयाचें, असा निश्चय केला. आतां मात्र **फॉग** इंग्लंडला लवकर जाईल तितकें **फिक्सला** चांगलें असल्यामुळें त्याच्या प्रवासास अडथळा आणण्याचा त्यानें प्रयत्न केला नाहीं. उलट, जलद प्रवास होण्यास जितकी मदत होईल तितकी त्यानें त्याला केली, व **फॉग** ज्या बोटीनें अमेरिकेस जाण्यास निघाला, त्याच बोटीनें तोहि निघाला.

**याकोहामा** सोडल्यापासून नऊ दिवसांनीं **फॉगची** अर्धी पृथ्वीप्रद-क्षिणा संपली होती. ऐशीं दिवसांपैकीं बावन दिवस संपले होते खरे; पण पुढचा प्रवास सारखा सरळ होता. म्हणून राहिलेल्या मुदतींत तो तडीस जाणार, असें **फॉगला** वाटलें. मिसेस **आवडाला** आतां **फॉग** फारच आवडूं लागला. त्याचे तिच्यासंबंधानें कोणत्याच तऱ्हेचे मनो-विकार मात्र बाहेर पडले नाहींत.

या मंडळीचा अमेरिकेचा प्रवास सुखरूप झाला, व ठरलेल्या वेळीं बोट **सॅनफ्रान्सिस्कोला** आली. येथून **न्यूयॉर्क** तीन हजार मैलांवर होतें. पण तेथपर्यंत सारखी रेलवे होती. हा प्रवास सात दिवसांत संप-वून **लिव्हरपूलला** जाणारी बोट अकरा नव्हेंबरला आपणांला मिळेल, असें **फॉगला** हिशेबावरून कळलें, व आपण पैज जिंकणार, असें त्याला वाटूं लागलें.

या मंडळीचा रेलवेचा प्रवासहि सुरक्षित झाला; पण मध्यें जंगलांत रेड इंडियन्सूनीं एके ठिकाणीं रेलवेवर हल्ला केला, व **पासेपारटाऊटला**

बंदिवान करून नेलें. आपल्या नोकराला असा टाकून पुढें जाणें **फॉगच्या** मनांत येणें शक्य नव्हतें. म्हणून गेटावरील कांहीं शिपाई घेऊन तो त्या इंडियनांचा पाठलाग करीत गेला, व त्यानें शर्थीनें लढून आपल्या नोकराला सोडवून परत आणलें; पण ते स्टेशनवर येतात, तों आगगाडी पुढें निघून गेलेली !

दुसरी गाडी सायंकाळपर्यंत यावयाची नव्हती. आतां **फॉगला** ठरलेल्या वेळापेक्षां वीस तास उशीर झाला होता. पण काय करणार ? इतक्यांत **फिक्सनें** एक युक्ति सुचविली. अमेरिकेंत थंडीच्या दिवसांत जिकडे तिकडे बर्फ पडलेलें असतें, व त्यावरून शिडाच्या साहाय्यानें जलद चालणाऱ्या **स्लेज** नांवाच्या गाड्या असतात, त्या केव्हां केव्हां आगगाडीपेक्षांहि जलद चालतात. अशा **स्लेजनें** पुढें जावें, असें **फिक्सनें** सुचविलें.

हें ऐकल्याबरोबर स्लेजनेंच जाण्याचा निश्चय करून **फॉगनें** ती ठरविली, व **फिक्स** धरून तीं चवघेंजणें या विलक्षण वाहनांतून निघालीं. वाटेनें त्यांना अत्यंत थंडी वाजली; पण याप्रमाणें त्यांनीं दोनशें मैलांचा प्रवास केला, व लागलीच आगगाडी गांठली. तेथून त्यांना अजून नऊशें मैल जावयाचें होतें. कोणत्याहि तऱ्हेचा अडथळा न होतां ते **न्यूयॉर्कला** अकरा डिसेंबर रोजीं रात्रीं अकरांच्या सुमाराला येऊन पोहोंचले.

पण काय नशीब ! **लिव्हरपूलला** जाणारी बोट पाऊण तास आधीं सुटली होती ! झालें ! एक पाऊण तासाकरितां पैज हरण्याचा प्रसंग आला ! पण **फॉग** निधड्या छातीचा माणूस होता ! त्यानें सर्व डॉक फिरून, तावडतोब निघणाऱ्या आगबोटीची चवकशी केली. शेवटीं एक रिकामी बोट त्याला दिसली. ती तावडतोब निघावयाची होती; पण त्या बोटीचा मालक **बोर्डोला** जावयाचा होता, व तो उतारू नेण्यास तयार नव्हता. " मला कोणी दोनशें डॉलर्स उतारूपाठीमागें दिले, तरी त्यांना मी नेणार नाहीं ! " असें तो म्हणाला.

**फॉगनें** शांतपणें त्याला उत्तर दिलें, “ दरमाणशीं दोन हजार डॉलर्स देतों. ”

इतकें भाडें ऐकून त्या बोटीच्या मालकाच्या तोंडाला पाणी सुटलें, व त्यानें त्यांना नेण्याचें कबूल केलें; ते चौघे बोटींत ताबडतोब आले, व बोट सुरू झाली.

**फॉगनें** हळूहळू सर्व खलाशी अनुकूल करून घेतले, व त्या मालकाला बंदिवान करून त्यानें आगबोट **लिव्हरपूलकडे** विलक्षण जोरानें हांकण्यास सांगितलें. त्यांचा हा प्रवास झपाट्यानें झाला. ता. १६ डिसेंबर रोजीं अमेरिका व लंडन यांमधील त्यांचा अर्धा प्रवास संपला.

इतक्यांत एंजिनियरनें सांगितलें “ कोळसा संपत आला ! ”

**फॉग** म्हणाला “ कांहीं हरकत नाहीं ! कोळसा असेपर्यंत जोरानें चालूं द्या. ”

नंतर त्यानें त्या मालकाला त्याच्या कैदेच्या कोठडींतून बाहेर काढलें; व म्हटलें, “ आगबोट मला विकत देतोस कीं काय, हें विचारण्याकरितां मीं तुला इथें बोलाविलें आहे. ”

मालक रागानें ओरडून म्हणाला “ नाहीं, बोट मी विकणार नाहीं !”

“ तर मग मला सरपणाकरितां तिचा कांहीं भाग जाळला पाहिजे !”

मालक उद्गारला “ जाळली पाहिजे ! मला तिच्याकरितां पन्नास हजार डॉलर पडले आहेत ! ”

“ हे घे साठ हजार ! ” असें म्हणून **फॉगनें** तितक्या किंमतीच्या नोटा मालकापुढें ठेवल्या.

यामुळें बोटीच्या मालकाचा राग कोठल्या कोठें गेला, व त्यानें जलद प्रवासाकरितां पाहिजे तें करण्याचा निश्चय केला.

**लिव्हरपूलला** बोटीनें जाण्यापेक्षां आयर्लंडला जाण्यानें कांहीं तास कमी लागतील, असें कळल्यावरून ते तेथें उतरले, व लगेच **डबिलनला** जाऊन तेथें बोटींत बसून ते **लिव्हरपूलला** बारा वाजतां पोहोंचले.

येथून लंडन सहा तासांच्या पल्ल्यावर राहिलें होतें. पण मंडळी धक्क्यावर उतरल्याबरोबर **फिक्सनें** वॉरंट काढलें, व **फॉगला** अटक केली. झालें ! इतकी खटपट करून लंडनला जाण्याची वेळ असूनहि या अटकेमुळें पैज बुडणार असें **फॉगला** वाटलें. त्यानें आपल्या डायरींत 'शनिवार ता. २० दिजंबर बारा,' असें लिहून ठेवलें. अजूनहि त्याला लंडनला पोहोंचणें शक्य होतें.

इतक्यांत **फिक्स** परत आला, व त्यानें 'खरा चोर सांपडला; आपली अटक काढली आहे,' असें त्याला सांगितलें. त्याबरोबर **फॉगनें** त्याला एक गुद्दा लगाविला.

मिसेस **आवडा, पासेपारटाऊट व फॉग** ही मंडळी स्टेशनवर येऊन स्पेशलनें निघाली, व **लंडनला** नवांच्या आधीं दहा मिनिटें स्टेशनवर पोहोंचली.

**फॉग** घरीं आला, तों पांचच मिनिटें उशीर झाला. एवढीं संकटें सोसून सर्व पृथ्वीप्रदक्षिणा करून तो आला पण पांचच मिनिटें उशीर झाला !

झालें ! **फॉग** पैज हरला ! प्रवासांत व पैजेंत त्यानें आपले बहुतेक पैसे घालविले ! अर्थात् ती रात्र सर्वांना अत्यंत दुःखांत गेली.

दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं त्यानें **आवडाची** भेट घेतली, व "माझी राहिलेली सर्व इस्टेट मी तुम्हांला दिली आहे," असें तो तिला दुःखानें म्हणाला.

मिसेस **आवडा** म्हणाली "तुम्ही पुढें काय करणार ? या दुःखांत तुम्हाला कोणी वाटेकरी आहे काय ?"

**फॉग** म्हणाला 'नाहीं ! मी जगांत एकटा आहे. मला कोणी स्नेही किंवा नातेवाईक नाहीं ! जिवलग मित्र असल्यास मनुष्याला दुःख सहन करण्यास धैर्य येतें."

मिसेस **आवडा** म्हणाली " मी आपली धर्मचारिणी होऊन आपल्या दुःखाची वांटेकरीण होण्यास तयार आहे ! "

तिचें हें भाषण ऐकून अशा दुःखद स्थितींतहि **फॉगला** फार आनंद झाला, व तो म्हणाला " माझें तुमच्यावर प्रेम जडलें आहे. आपल्या म्हणण्यास मी आनंदानें रुकार देतों. "

**फॉगनें** तावडतोब आपल्या नोकराला बोलावून आणलें, व आपण आठ वाजतां लग्न करणार, असें त्याला सांगून त्या प्रसंगीं शेजारच्या देवळांतील उपाध्यायाला वेळेवर येण्यास सांगण्याकरितां त्याला पाठविलें.

तो चाकर आनंदानें उड्या मारीतच गेला. देवळांत त्याला कळलें, कीं, उद्यां रविवार असल्यामुळें लग्न होणें शक्य नाहीं ! तत्क्षणीं ' आज शनिवार आहे, ' असें त्याला कळलें. मग काय विचारतां ! त्याचा आनंद गगनांत मावेना ! तो धापा टाकीत **फॉगकडे** आला, व त्यान ' आज शनिवार ' असें त्याला सांगितलें. **फॉगला** भारी आश्चर्य वाटलें; पण ती आश्चर्याची वेळ नव्हती. तो तावडतोब क्लबांत जाण्यास निघाला.

इकडे क्लबांत **फॉगची** स्नेहीमंडळी त्याची वाट पहात होती. **फॉग लिव्हरपूलला** आल्याबद्दल कांहीं एक बातमी नव्हती. तेव्हां तो लंडनला येणें शक्य नाहीं, म्हणून पैज जिंकल्याबद्दल ती मंडळी आनंदांत गर्क झाली होती, तोंच नवांच्या ठोक्याला **फॉग** क्लबच्या दारांत आला, व म्हणाला "सद्गृहस्थहो ! हा मी पृथ्वीप्रदक्षिणा करून ठरल्याप्रमाणें आलों ! "

सर्व मंडळी आश्चर्यानें थक्क झाली. **फॉगनें** पैज जिंकली. त्याचे वीस हजार पौंड वांचले, व पांच हजार आणखी मिळाले.

त्यानें हजारों पौंड प्रवासांत खर्च केले होते. पण त्यानें पैशाकरितां पैज मारलीच नव्हती. आतां **फॉग**सारख्या व्यवस्थित माणसाची दिवस मोजण्यांत अशी चूक कशी झाली, हा प्रश्न उद्भवतो. याचें उत्तर असें आहे, कीं **फॉग** पूर्वेकडे प्रवास करीत गेल्यामुळें त्याला नकळत एक दिवस

त्याच्या पदरांत पडला होता. कारण, तो पूर्वेकडे जात असतांना प्रत्येक डिग्रीच्या मागें चार मिनिटें त्याला मिळालीं, व ३६० डिग्री ८० दिवसांत प्रवास केल्यावर बरोबर त्याला वीस तास मिळाले. म्हणजे त्याला जें आपण शनिवारीं रात्रीं लंडनला पोहोंचलों असें वाटलें, तें खोटें होतें. तो खरोखरीं शुक्रवारीं पोहोंचला होता.

याप्रमाणें विलक्षण त्रास व दगदग करून व पैसे खर्च करून ठरल्या वेळांत **फॉगनें** आपली पृथ्वीप्रदक्षिणेची पैज सिद्धीस नेली.

वर वर्णिलेल्या पृथ्वीप्रदक्षिणेपेक्षां आमच्या प्रत्यागमनाचा प्रवास फारच लहान होता. तरी पण आम्हांला सुमारें सतराशें मैलांची वाट चालावयाची होती. त्यांपैकीं सुमारें दोनशें मैल तर टांग्यानें जावयाचें होतें. पैजेकरितां नव्हे, पण कामाकरितां आम्हांलाहि नियमित वेळांतच हा प्रवास संपवावयाचा होता. माझ्या बंधूंचें कोर्ट ता. ७ जूनला उन्हाळ्याच्या सुटीनंतर उघडावयाचें होतें. तेव्हां मुंबईहून त्यांना निदान सहा तारखेच्या बोटीनें निघणें प्राप्तच होतें. ह्मणजे आम्हांला मुंबईला पांच तारखेला पोहोंचावयाला पाहिजे होतें. बिजलीबाबूपाशीं या प्रवासाची चवकशी करतां त्यांनीं आम्हांला सांगितलें होतें, कीं, मेल टांग्यानें दोन दिवसांत रावळपिंडीला जातां येतें. आगगाडीनें मुंबईपर्यंत दोन दिवस लागतात. तेव्हां पहिल्या जूनला सकाळीं निघाल्यास दुसऱ्या जूनला रात्रीं आठ दहापर्यंत रावळपिंडीला सहज पोहोंचतां येईल, व तेथून तिसऱ्या तारखेला सकाळच्या कलकत्ता मेलनें निघून लाहोरला दोनप्रहरीं जाऊन, तेथें चार एक तास विश्रांति घेऊन, आणि जेवणखाण आटपून, बॉंबे-बरोडाच्या आगगाडींत रात्रीं आठ वाजतां बसलें म्हणजे मुंबईला पांच तारखेस आठ नऊ वाजतां जावें, असा आम्हीं मनाशीं बेत ठरविला होता. तो कसा व कितपत तडीला गेला, त्याचेंच आतां वर्णन करावयाचें आहे.

**तारीख १ जून**—आम्ही पहांटेला पांच वाजतां धनजीभाईच्या टांग्याच्या अड्ड्याशीं आलों. टपालाचीं पार्सलें व इतर सामान घेऊन तीन

टांगे निघावयाचे होते. आम्ही दोघे निरनिराळ्या टांग्यांत बसलों, व साडे-पांच वाजतां टांगे चालू झाले. टपालाच्या टांग्याचे टप्पे दर पांच मैलांवर आहेत. सरासरी एक टप्पा चालण्यास चाळीसपासून पंचेचाळीस मिनिटें लागत, असें आमच्या दृष्टोत्पत्तीला आलें. प्रत्येक टप्प्याच्या ठिकाणीं घोडे बदलण्यास आठ दहा मिनिटें लागत. तेवढा काय तो विसावा ! बाकी या टपालाच्या टांग्यांत मनुष्य हादरून हादरून त्याचे सांधे अगदीं दुखावयाला लागतात.

**श्रीनगर**पासून **बारामुळ्या**पर्यंत रस्ता सपाट आहे, व त्याच्या दोन्ही बाजूंना सफेद्याचीं झाडें आहेत, हें मागें सांगितलेंच आहे. आम्ही नंदन-वन दूर टाकून भराभर पुढें चाललों होतों, याबद्दल मिश्र विकार माझ्या मनांत येत होते. सुदैवानें इतका सुंदर प्रदेश आपणाला पहावयास मिळाला, याबद्दल आनंद होत होता, तर पुनः कधीं या प्रांतांत येण्याला पैशाची व वेळाची आपणाला सवड व्हावयाची नाहीं; आतां त्या नंदन-वनाचें पुनर्दर्शन दुर्लभ आहे, असें मनांत येऊन वाईट वाटत होतें.

सभोंवारची वनश्री व हिमश्री मधूनमधून मन आकर्षित होतीच. ‘आज टांगे कोठपर्यंत जाणार ?’ अशी हांकणारापाशीं सहज चौकशी करतां त्यानें सांगितलें, कीं ‘टांगे साठपांसष्ट मैलांवर जाऊन थांबतील.’ ही बातमी ऐकून आमचें धाबें दणाणलें. कारण, टांगे सायंकाळीं सात-साडेसातपर्यंत तरी चालतील, व तसें झाल्यास एका दिवसांत निदान ऐशीं नव्वद मैलांचा पल्ला आपण गांठूं असा आमचा अंदाज होता. पण तो अंदाज ढांसळणार, व तसें झाल्यास आमचे पुढचे आगगाडी साध-ण्याचे बेत फसणार, असें आम्हांला वाटूं लागलें, व मनाला ही नवी हुरहूर लागली. अकरा साडेअकरांच्या सुमाराला आम्ही **बारामुळा** येथें पोहोंचलों म्हणजे पसतीस मैल पल्ला आम्ही गांठला. ‘आम्हांला **रावळपिंडीला** उद्यां रात्रीपर्यंत तरी जाणें आवश्यक आहे तरी टांगा सायंकाळपावेतों चालविण्यास हांकणाराला सांगावें,’ अशी आम्हीं तेथल्या

एजंटाला विनंति केली, व त्यानें टांगेवाल्याला तसें सांगतों, म्हणून कबूलहि केलें.

नवे घोडे जोडून झाल्याबरोबर आमचे टांगे निघाले. यानंतर आम्ही हिमालयाच्या प्रचंड दऱ्याखोऱ्यांत प्रवेश करणार होतों, यामुळें मनाला एक प्रकारची भीति वाटली. आतां दीडशें मैलपर्यंत सपाटी किंवा मैदान यांचें नांवहि काढावयाला नको; आतां आमचे सोबती म्हणजे झेलम नदी, प्रचंड पहाड, गर्द रानें व हिमाच्छादित पर्वतशिखरें हीं होत, असें माझ्या मनांत येत आहे, तोंच आम्ही **बारामुळ्या**ची सपाटी टाकून हिमालयाच्या प्रचंड रांगांच्या दरवाज्यांतून दरींत प्रवेश केला, व झेलमच्या नागमोडी रस्त्याला प्रारंभ झाला.

आणखी दोन टप्प्यांनीं आम्ही **रामपुर**ला आलों. टांगा प्रत्येक टप्प्याला फारच थोडा वेळ रहात असे; यामुळें आम्हांला फराळसुद्धां टांग्यांतच करावा लागे. **रामपुरहून श्रीनगर**ला जेथून वीज नेली आहे, तें ठिकाण **मोहरा**–एका टप्प्यावरच आहे, येथें आम्ही आलों, तों दोन वाजले.

तेथून आणखी दीड तासानें म्हणजे साडेतीन वाजतां आम्ही **उरी** या मोठ्या गांवीं आलों. अजून तीन तास टांगा चालण्यास कांहींएक हरकत नाहीं, व इतक्या वेळांत आणखी वीस पंचवीस मैलांचा पल्ला गांठतां यावा असें आम्हांला वाटलें. त्याप्रमाणें आम्ही टांगा हांकणाराला सांगितलें, व त्याला पुढें चालण्याकरितां बक्षिसहि देऊं केलें. **बारामुळ्या**प्रमाणें येथल्याहि एजंटाला, आम्हांला **रावळपिंडी**ला लवकर पोहोंचण्याची किती निकड आहे याबद्दल आम्हीं सांगितलें. पण तो एजंट म्हणाला "येथून पुढें टपाल आतां निघणें शक्य नाहीं; कारण, **उरीस पंच** या भागाकडून टपाल यावयाचें असतें तें सायंकाळीं येतें, व मग पहाटेस तेथून टपालाचा टांगा सुटतो. उद्यां मात्र टांगा जाईल तितका पुढें नेण्यास मी हांकणाराला सांगेन."

तेव्हां आमचा नाइलाजच झाला. पण पुढें तरी लवकर जाण्यास सांपडेल, यावर आम्हीं समाधान मानलें. **उरीस** आम्ही हिंदु स्वयंपाकघरांत बिऱ्हाडास राहिलों. कारण, सबंद दिवसांत आम्हांला जेवण मिळालें नव्हतें. म्हणून तेथें भोजन करून लवकरच आम्हीं विश्रांति घेतली, व बासष्ट मैलांच्या प्रवासाच्या दगदगीनें आम्हांला झोंपहि ताबडतोब लागली.

**तारीख २ जूनः—उरी**हून आम्ही पहांटेला पांच साडेपांच वाजतां निघालों. **उरी** येथें नदीपासून पहाड जरा दूर दूर गेले असल्यामुळें थोडी मोकळी जागा आहे, व त्यामुळें मनाला कोंडल्यासारखें किंवा सांधींत सांपडल्यासारखें वाटत नाहीं. हें ठिकाण **श्रीनगर**पेक्षां आठशें फूटच खालीं आहे. येथून मात्र रस्ता पुनः पहाडांच्या चिळणींतून चालला आहे, व आपण खोलखोल उतरत आहों असें वाटतें, व तें खरेंही आहे. कारण येथून **चाकोटी** चवदाच मैल आहे; पण इतक्यांत आठशें फुटांचा उतार आहे. **चाकोटीला** आम्ही साडेसातांच्या सुमाराला आलों, व थोडेसें कांहीं खाऊन पाणी प्यालों.

येथून आम्ही निघालों, ते एका तासानें **चिनारीस** आलों. **श्रीनगरला** जातांना याच ठिकाणीं आम्ही विश्रांतीकरितां दोनअडीच तास थांबलों होतों. यामुळें हें ठिकाण ओळखीचें असें आम्हांला वाटलें.

**चिनारी**हून पुनः एका तासानें **हट्टी** या ठिकाणीं आम्ही आलों. आमच्या पहिल्या प्रवासांत या ठिकाणीं आम्ही रात्रीची वसती केली होती; पण आतां येथें आठदहा मिनिटांपेक्षां जास्त वेळ घालवितां येणें आम्हांला शक्य नव्हतें. आज आमचे खाण्याचे हालच चालले होते; पण आमचें लक्ष **रावळपिंडीला** आम्ही केव्हां जातों, इकडे लागलें होतें, यामुळें खाण्यापिण्याकडे लक्ष द्यावयाला आम्हांला सवडच नव्हती.

**गढीला** आम्ही बारा वाजतां येऊन **गढी**हून दोनअडीच तासांनीं **डोमेल** या ठिकाणीं आलों. येथेंच **अपटाबाद**कडून येणारा रस्ता

**रावळपिंडी**च्या रस्त्याला येऊन मिळतो. येथें **किशनगंगा** नदी **झेलम**ला येऊन मिळते. येथें संगमाच्या ठिकाणीं चांगला दगडी पूल बांधलेला आहे. येथला देखावा केवळ अद्वितीय आहे. तो पुनः एकदां निरखून पहाण्यांत आम्ही अगदीं गढून गेलों. येथपर्यंत **झेलम** नदी पश्चिमवाहिनी आहे, ती आतां एकदम दक्षिणवाहिनी होते. **किशनगंगा** थेट उत्तरेकडून येते. यामुळें **किशनगंगा** पुढें **झेलम** होते, असा येथें भास होतो. **उरी**पेक्षां **डोमेल** दोन हजार फुटांनीं सखल आहे.

येथून दोन टप्प्यांनीं **डुलाई** हें गांव आलें. येथें आम्ही चार वाजतां आलों. येथून एका टप्प्यानें आम्ही **छत्तर**ला आलों. जातांना येथें आम्ही विश्रांतीकरितां थांबलों होतों. येथल्या धो धो वहाणाऱ्या झोताखालीं त्या वेळीं आम्ही स्नानहि केलें होतें; पण आतां तितका वेळ नव्हता, तरी त्या सुंदर झऱ्याचें पाणी पिण्यास आम्ही विसरलों नाहीं.

येथून एका तासानें आम्हीं **कोहाल्यास** आलों, तों साडेपांच होऊन गेले होते. येथें **झेलम** नदीचा पूल ओलांडला, कीं, ब्रिटिश हद्द लागते. आतांपर्यंत आम्ही काश्मीर संस्थानच्या हद्दींत होतों. नंदनवनाची हद्द संपली, हें पाहून मनाला थोडेंसें वाईट वाटलें. आमच्या प्रवासांतील सर्वांत सखल ठिकाण म्हणजे **कोहाला** हें होय. हें समुद्रसपाटीपासून अवघें दोन हजार फूट उंच आहे. **श्रीनगर**पासून आम्ही आतां बत्तीसशें फूट खालीं आलों होतों, व तेथून १३४ मैलांचा पल्ला गांठला होता. येथून **रावळपिंडी** फक्त चवसष्ट मैल राहिली, म्हणून आम्हांला आनंद झाला.

आतां साडेपांच झाले होते, व टांगेवाला येथेंच थांबावयाचें म्हणून म्हणत होता; पण आम्ही त्याला आणखी एक मुक्काम तरी पुढें चालण्या-बद्दल आग्रह केला, व त्यानींहि तें कबूल केलें. आम्ही पुढें निघालों ते साडेसात वाजतां **फुगवाडीस** आलों. **कोहाल्यापासून** सारखा चढणीचा रस्ता लागतो. कारण, **मरी**पर्यंत साडेपांच हजार फूट चढा-

वयाचें असतें. **फुगवाडी**ला आम्हीं वसती केली. पहिल्या प्रवासांत **रावळपिंडी**हून निघून सायंकाळीं आम्ही **फुगवाडी**लाच वसतीला आलों होतों. मागच्या खेपेला आम्ही येथें जेवण केलें होतें. पण आतां कांहीं हा त्रास आम्हांला होईना. तेथें मिळणाऱ्या पुऱ्या भाजीवरच आम्हीं भूक भागविली. दोन दिवस मिळून आमचा एकंदर एकशें चवेचाळीस मैलांचा पल्ला पुरा झाला.

आतां **रावळपिंडीहून** सकाळीं निघणारी **कलकत्ता** मेल मिळवून आम्ही **लाहोरला** जेवणखाण करण्यास जाणार होतों, तो बेत सिद्धीला जाणें अशक्य झालें. मुंबईला ५ तारखेला पोहोंचावयाचें असल्यास **रावळपिंडीला** दोनप्रहरीं दीड वाजतां निघणारी गाडी गांठून थेट बी. बी. सी. आय. नें जाण्याचा आम्हीं बेत केला; पण तो तरी साधतो कसा, अशी आम्हांला विवंचना होतीच; पण जास्त खर्च झाला तरी फिकीर न करतां तो तडीला नेण्याचा आम्ही निश्चय केला. आम्हांला **मरीस** लवकर नेऊन पोहोंचवण्याबद्दल टांगेवाल्याला बजावून आम्ही **फुगवाडींत** एका वाण्याच्या घरांत चौपाईवर झोंपी गेलों.

**तारीख ३ जून**—सकाळीं साडेपांच वाजतां आम्ही टांग्यांत बसलों व टांगेवाल्याला जलद टांगा हांकण्यास सांगितलें. **कोहाल्या**पासून **मरी**पर्यंत सारखा चढता रस्ता आहे. यामुळें टांग्याचा वेग तितका जोराचा असत नाहीं. तरीपण आम्ही दोन तासांत **मरीला** आलों. धनजीभाईच्या टांग्याच्या अड्ड्यावर आम्ही येतों, तों साडेसात झाले. तेथून रावळपिंडी बरोबर चाळीस मैल राहिली होती. टपालाचे टांगे सायंकाळीं चार पां-चच्या सुमाराला पोहोंचतील, असें आम्हांला समजलें. आम्हांला तर रावळपिंडीला दोनप्रहरची दीड वाजतांची गाडी गांठणें अवश्य होतें. ती साधली तरच आम्ही पांच तारखेला मुंबईला जाणें शक्य होतें. अजून रावळपिंडीहून आगगाडी सुटण्यास सहा तास अवकाश होता. तेव्हांच्या तेव्हां स्वतंत्र टांगा काढला तर आम्ही रावळपिंडीस वेळेवर पोहोंचूं, असें

आम्हांला वाटलें. त्याप्रमाणें आम्ही एजंटला विचारलें. तो म्हणाला "तुमचीं दोन तिकिटें आहेत. आणखी एक तिकीट काढीत असलां, तर तावडतोब तुम्हांला स्वतंत्र टांगा देतों."

आम्ही लागलीच मरीपासून रावळपिंडीचें साडेसात रुपये देऊन आणखी एक तिकीट घेतलें, व टांगा घाईघाईनें जोडण्यास सांगितलें. आम्हांला थांबावयाला मुळींच वेळ नव्हता. म्हणून थोडेसें दूध व केळीं घेतलीं, व त्यांवर न्याहारी करून बरोबर आठ वाजतां टांग्यांत पाय ठेवला. आम्हांला आतां पांच तासच होते. चाळीस मैल जाण्यास ताशीं आठ मैल—टप्प्याच्या ठिकाणीं होणारा खोळंबा धरून—चालण्याचा वेग पडला पाहिजे, तरच आम्ही वेळेवर पोहोंचणार, हें उघड होतें. पण आतां सात हजार फुटांचा उतार होता, तेव्हां वेळेवर जाऊं, अशी आम्हांला बरीच आशा वाटूं लागली. टांगेवाल्यालाहि बक्षिसाचें आमिष आम्हीं लावलेंच होतें. तेव्हां अर्थात्च तोहि टांगा भरधांव चालवीत होता.

रावळपिंडीपर्यंत आठ टप्पे होते. अर्थात्च आम्हांला सात ठिकाणीं घोडे बदलावयाचे होते. त्यांत सरासरी एक तास जाणार असल्यामुळें टांग्याचा प्रत्यक्ष वेग ताशीं दहा मैलांचा पाहिजे होता. त्याप्रमाणें एक टप्पा आम्ही पसतीस मिनिटांत गांठीत होतों. घोडे जोडण्यास सरासरी दहा मिनिटें मोडत; तेव्हां पाऊण तासानें पांच मैल, असा वेग पडत होता.

आम्ही आतां हिमालयाची शेवटची प्रचंड ओळ भराभर उतरत होतों. अजूनहि हिमालयांतील विशिष्ट झाडें व विशेषतः उंच उंच फर झाडें लागत होतीं. पण लवकरच तीं दृष्टीआड होत चाललीं, व पंजाबां-तील देखाव्यासारखा देखावा दिसूं लागला. आमचा पाऊण तासांत पांच मैल हा वेग अजूनहि कायम होता. याप्रमाणें सारखे दौडत आम्हीं पंचवीस मैल पल्ला गांठला. आतां पुढें सपाटीचा रस्ता राहिला.

सर्व घाट संपला खरा; पण या टप्याला येतों, तों बारा वाजले. आतां फक्त दीड तास राहिला, आणि आम्हांला पंधरा मैल जावयाचें होतें.

आमची गाडी चुकते कीं काय, अशी आतां मनांत धाकधूक वाटूं लागली. इतक्यांत आणखी एक अडचण उपस्थित झाली. टप्प्यावर घोडे मुळींच शिल्लक नव्हते! कारण, आतां **काश्मीर** व **मरी**कडे जाणारे टांगे फार होते. येणारे तितके नव्हते. यामुळें ठाण्यावर घोडा नव्हता.

झालें! आतां आमची गाडी चुकणार, व आमचा वेळेवर मुंबईस जाण्याचा बेत ढांसळणार, हें पाहून आम्हांला विलक्षण वाईट वाटलें. टप्प्याचा अड्डेवाला म्हणाला, "एक घोडा आहे, पण तो अजून जोखडाला कधींहि जोडलेला नाहीं." टांगा हांकणाराला बाक्षिसाची लालूच होतीच. तेव्हां त्यानें असा घोडा प्रथमच टांग्याला जोडण्याचें कबूल केलें, व आपण आतां खास वेळेवर पोहोंचणार, अशी आशा आम्हांला वाटूं लागली! आम्हीं दोनतीन माणसांनीं टांग्यास आणलेला घोडा सोडला, व दुसरा घोडा जोडूं लागलों. तो प्रथम जोखडाखालीं उभाच राहीना! पण मोठ्या प्रयासानें आम्हीं त्याच्या मानेवर जूं ठेवलें; तोंडांत लगाम घातली, व हांकणाराच्या हातीं वादी दिली मात्र-टांग्यांत आम्हीं आधींच बसलों होतों-तों घोडा वाऱ्यासारखा पळूं लागला; दुसऱ्या घोड्याची त्रेधा झाली; पण त्याच्याबरोबर तो चालत होता. या घोड्याचा वेग इतका विलक्षण होता कीं, आम्ही टांग्यांत घाबरून गेलों.आज कांहीं आपली धडगत नाहीं, टांगा कोठें तरी खड्ड्यांत पडून त्याचा चक्काचूर होऊन आम्हांला इजा होणार, असें क्षणोक्षणीं वाटूं लागलें; पण हांकणारा मोठा हिंमतीचा माणूस होता. तो आम्हांला धीर देत लगामानें घोड्याला आवरण्याचा प्रयत्न करीत होता. पण व्यर्थ! घोडा अगदीं बेफामपणें चालला होता. शेवटीं तो टप्प्याजवळ आला. हांकणारानें टांगा शिकस्तीनें थांबविला, व तो घोडा टांग्यापासून दूर केला, तेव्हां आमच्या जिवांत जीव आला. घड्याळांत पहातों तों आम्ही पंधरा मिनिटांच्या आंत या टप्प्याला आलों होतों.

आतां काय, रावळपिंडी फक्त दहा मैल होती, व आम्हांला अजून सवा तास होता. पुढला एक टप्पा आम्हीं अर्ध्या तासाच्या आंतच गांठला व रावळपिंडीच्या स्टेशनांत आलों, तों गाडीला वीस मिनिटें अवकाश होता. आम्ही टांगा हांकणाराला दोन रुपये बक्षिस दिले. इतका त्रास व दगदग करून, अन्नपाण्याखेरीज बहुतेक प्रवास करून आम्ही शेवटीं वेळेवर येऊन पोहोंचलों. यामुळें आम्हांला फार आनंद झाला, व तहानभूक त्या वेळापुरती तरी आम्ही पार विसरून गेलों.

तिकीट ऑफिसांत चवकशी करतां या गाडीला तिसरा क्लास नाहीं, असें आम्हांला कळलें. तेव्हां आमच्या मनाची पुनः चलबिचल झाली. पण विचार करण्यास आतां वेळ नव्हता. इतक्या खटाटोपानें आल्यावर पैशाकरितां गाडी चुकविणें बरोबर नव्हतें, व **लाहोर**पासून आम्हांला बी. बी. सी. आय. रेलवेनें तिसऱ्या क्लासानें जातां येत होतें. म्हणून **रावळपिंडी**पासून **लाहोर**पर्यंतचीं सेकंड क्लासचीं दोन तिकिटें काढून आम्ही गाडींत येऊन बसलों. मरीहून येण्याकरितां व ही गाडी मिळण्याकरितां आमच्या पैशाच्या पिशवीला पंचवीस रुपयांचा खार लागला पण बेत केल्याप्रमाणें सतत आठ तासांची दगदग सोसून शेवटीं आम्ही वेळेवर मुंबईस पोहोंचणार, या विचारानें आम्हांला अतोनात आनंद वाटला.

आतां **लाहोरला** थांबणें शक्य नव्हतें, म्हणून 'आम्ही एकदम देशीं निघून गेलों,' अशी आमच्या लाहोरच्या स्नेह्याला तार केली. गाडींत बसल्यावर मनाला एकदांचा धीर आला, व मग आम्हांला पोटोबाची आठवण झाली. सकाळपासून आम्हीं दूध व केळीं यांखेरीज कांहीं खाल्लें नव्हतें; म्हणून आतां चांगला फराळ करून आम्हीं यथेच्छ पाणी प्यालों. इतकें होत आहे, तों गाडीची वेळ होऊन भप्भप् करीत आमची गाडी चालू झाली.

आतां आम्हांला तो पंजाबचा रुक्ष प्रदेश व तेथचा तो भयंकर ऊष्मा यांचा अनुभव येऊं लागला, आणि नंदनवनाची शोभा व तेथली शीतल

हवा यांची राहून राहून आठवण होऊं लागली. आतां पुनः तें दुर्लभ स्थान आपल्याला अप्राप्त आहे, असें मनांत येऊन फार वाईट वाटलें. गाडी झपाट्यानें चालली होती. दोनअडीच तासांनीं **झेलम** नदी व **झेलम** स्टेशन हीं लागलीं. उगमाशीं एवढीशी असलेली नदी आतां केवढी प्रचंड झाली आहे, हें पाहून आम्हांला आश्चर्य व आनंद वाटला; आणि सहजगत्या 'उत्तररामचरित्रां'तील '**अहो ईदृश एव संवृत्तः**' या सीतेच्या उद्गाराचें स्मरण झालें. ही नदी आतां आम्हांला चिरपरिचित अशा सखीसारखीच वाटूं लागली होती. म्हणून स्टेशन सुटल्यावर वियोगदुःखासारखा मनोविकार आम्हीं अनुभवला, यांत नवल नाहीं.

आम्ही सातांच्या सुमाराला **लाहोरास** पोहोंचलों. **पेशावर**पासून **लाहोर**पर्यंत जी. आय. पी. रेलवेची पंजाब मेल व बी. बी. सी. आय. रेलवेची मेल एकच आहे, व तिला थर्ड किंवा इंटर क्लास नाहीं; म्हणूनच आम्हांला सेकंडक्लासचीं तिकीटें घ्यावीं लागलीं. **लाहोरास** मात्र या मेली वेगळ्यावेगळ्या होतात, व त्या वेगवेगळ्या मार्गांनें जाऊन पुनः **दिल्लीला** एके ठिकाणीं येऊन **दिल्ली**पासून **मथुरे**पर्यंत एकाच रस्त्यावरून जाऊन मग पुनः वेगवेगळ्या मार्गांनीं मुंबईस पोहोंचतात. जी आय. पी. रेलवे **अमृतसर**, **अंबाला** या शहरांवरून उत्तरपंजाबांतून दिल्लीस येते; तर बी. बी. सी. आय. रेलवे **फिरोजपूर**, **भाटिंडा** या शहरांवरून दक्षिणपंजाबांतून दिल्लीस येते.

**लाहोरास** पोहोंचल्यावर आम्हांला लागलीच बी. बी. सी. आय. रेलवेच्या गाडींत बसावयाचें होतें. पण आम्हांला आतां थर्ड क्लासचीं तिकिटें काढावयाचीं होतीं. येथें थर्ड क्लासचें तिकिट ऑफिस सेकंड क्लासपासून इतकें दूर आहे, कीं, नवख्या माणसाला तें सांपडणेंहि कठीण ! कारण, रेलवेच्या एका कांपाउंडामध्यें दोन ऑफिसें नाहींत, तर या दोन ऑफिसामध्यें भली लांबलचक व अखंड भिंत आहे. यामुळें या सेकंड क्लासाच्या कांपाउंडांतून अगदीं उघड्या रस्त्यावर येऊन मग तिसऱ्या क्लासचें निराळें ऑफिस लागतें. त्याला सभोंवार लोखंडी खांबाचें कुंपण असून आग-

गाडीच्या प्लॅटफॉर्मवर जाण्यास जमिनीखालून भुयारवजा जिन्यांतून वाट आहे. सेकंडक्लासकडून प्लॅटफॉर्म अगदींच जवळ व जावयाला फारच सोयीचा आहे. म्हणून आमचें सामान सेकंडक्लासांतून आयतें आलेलेंच होतें, तें तसेंच बी. बी. सी. आय. रेल्वेच्या प्लॅटफॉर्मकडे **नेण्यास** हमालाला सांगितलें. पण तिकीटकंडक्टर तसें करूं देईना. त्याच्या हातावर चार आणे ठेविले असते, म्हणजे त्यानें तेव्हांच परवानगी दिली असती. **पण** आम्हांला तशी **गोष्ट** कर्तव्य नव्हती; **म्हणून** आम्ही द्राविडी प्राणायाम करून त्या भुयारांतून आपलें सामान आल्या ठिकाणींच आणलें, व बी. बी. सी. आय. च्या गाडींत बसलों. या गाडीच्या थर्ड क्लासलासुद्धां लोंबतीं बाकें असल्यामुळें निजावयाची सोय बरी असते. आम्ही दोनअडीच दिवसांच्या दगदगीनें दमून गेल्यामुळें गाडींतील बांकावर अंग टांकतांच आम्हांला झोंप लागली. गाडी **दिल्लीस** पहांटेला येऊन पोहोंचली.

**तारीख ४ जून**—आम्हांला गाडी वगैरे कांहीं एक बदलावयाची नव्हती. आमची गाडी साडेपांच वाजतां दिल्लीहून निघाली, ती दोनअडीच तासांनीं **मथुरेला** आली. तेथें गाडी बराच वेळ थांबत असल्यामुळें येथें आम्हीं मुखमार्जन वगैरे करून मेवामिठाई व फराळाचें घेऊन पोटभर न्याहारी केली. **मथुरेहून** गाडी निघाल्यापासून पाऊण तासांत **भरतपूर** हें स्टेशन लागलें. याच गांवाचें नांव काय तें ओळखीचें होतं. पुढें या रस्त्यावर एकहि गांव इतिहासप्रसिद्ध नाहीं. **नागडा–मथुरा** हा रस्त्याचा फांटा अगदीं रुक्ष, कमी सुपीक प्रदेशांतून जातो, असें वाटतें. यामुळें हा सर्व रस्ता जरी आम्ही दिवसाचा चाललों, तरी सभोंवारचा देखावा पहाण्यालायक मुळींच वाटला नाहीं. या सगळ्या भागांत पळसाचें भुरटें रान मात्र बरेंच दृग्गोचर होत होतें. पळसाचें झाड हिंदुस्थानांत सर्वगामी आहे, असें आम्हांला दिसून आलें. **नागडा** या स्टेशनला आम्ही सायंकाळीं येऊन पोहोंचलों, व दिवसाच्या प्रवासांत आम्हीं चारशें मैलांच्या वर मजल मारली.

आतां मुंबई फक्त चारशेंचवतीस मैल राहिली. हजारों मैलांच्या लांबीवरून आल्यामुळें आतां मुंबई जवळ आली असें आम्हांला वाटूं लागलें. कारण, आतां रात्रीचाच काय तो प्रवास राहिला. उद्यां सकाळीं आपण मुंबईस जाणार, म्हणून मन प्रसन्न झालें. गाडींतच आम्हीं चांगला फराळ केला, व निद्रादेवीची वाट पहात राहिलों. तिनेंहि आमच्यावर लवकर अनुग्रह केला. पहांटेला उठतों तों खरोखरींच आपण मुंबईनजीक आलों, असें कळून आल्हाद वाटला.

**ता. ५ जून**—गाडी **पालघर** स्टेशनवर सकाळीं आली. तेथें आम्हीं चहा-केक घेतली. तेथून जी गाडी सुटली, ती एकदम **ग्रॅन्टरोडशीं** आली व तेथून गाडी थेट **कुलाब्याला** गेली. आम्ही कुलाब्याला नवाच्या सुमाराला आलों.

याप्रमाणें आम्ही श्रीनगराहून ता. १ जूनला सकाळीं पांच वाजतां निघालों, ते ५ जूनला नऊ वाजतां म्हणजे बरोबर १०० तासांत नंदनवनांतून स्वस्थानीं आलों. इतका एकसारखा व तांतडीचा प्रवास आम्हीं आजन्मांत केला नव्हता, पण इतका जलद प्रवास करून त्यांत कोणत्याहि प्रकारचें विघ्न न येतां तो तडीस गेला, याबद्दल आम्हीं परमेश्वराचे मनांत आभार मानले.

**ता. ६ जून**—सकाळीं माझ्या बंधूंना मीं बोटीवर पोहोंचविलें, व मी लगेच आठाच्या एक्स्प्रेसनें पुण्याला आलों. पंजाब व काश्मीरच्या प्रवासाला आम्ही पुण्याहून ता. ६ मेलाच निघालों होतों. बरोबर एक महिन्यांत आम्हीं जातांयेतां मिळून एकंदर पसतीसशें मैल प्रवास केला; व लहानमोठ्या तीसपसतीस ठिकाणीं उतरलों; आणि तीं थोड्याफार बारकाईनें पाहिलीं. हा आमचा प्रवास फार जलद व त्रासाचा झाला, यांत शंका नाहीं. या सर्व महिन्यांत आमची एक प्रकारची धांदल—लग्नघाईच होती. या अल्पकालांत जे अनुभव आम्हांला आले, ज्या नव्यानव्या गोष्टी आम्हीं पाहिल्या, त्या सर्वांमुळें आमच्या आयुष्याचा

हा महिना म्हणजे गर्दीचा महिना होता, असें म्हटलें पाहिजे. प्रवास आम्हीं जास्त सावकाशीनें, जास्त सवडीनें व जास्त थबकत थबकत केला असता, तर तो सुखकर, सोयीचा व समाधानकारक झाला असता, हें खरें; पण त्याला वेळाची आणि पैशाची मुबलकता पाहिजे होती, ती आमच्याजवळ कोठें होती ? या बाबतींत अंथरुण पाहून पाय पसरणें आम्हांला अवश्य होतें, व त्याप्रमाणेंच आम्ही वागलों.

काश्मीर व पंजाबचा प्रवास संपून आतां चार वर्षें झालीं, व आमचा एका महिन्याचा प्रवास वाचकांना सादर करण्यास इतका काळ लागला. पण एका अर्थीं हें बरेंच झालें. कारण, या अवकाशामुळें माझ्या या अपूर्व प्रवासाची जागृति इतक्या दिवस तरी कायम राहिली. जाण्यापूर्वीं बऱ्याच काळपर्यंत निदिध्यासरूपानें, तेथें गेल्यावर कांहीं काळ प्रत्यक्ष अनुभवानें व दर्शनानें आणि नंतर आजतागायत स्मृतिरूपानें ज्या नंदनवनानें माझें मन व्यग्र केलें होतें, त्या ‘ नंदनवनाच्या वर्णनाची समाप्ति ’ करून वाचकांची रजा घेतों.

# सूचि.

---